# मंथन

## राजभाषा वर्षातील वैचारिक लेखांचे संकलन





महाराष्ट्र शासन

# मंथन

## राजभाषा वर्षातील वैचारिक लेखांचे संकलन

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन




महाराष्ट्र शासन

# मंथन

## राजभाषा वर्षातील वैचारिक लेखांचे संकलन

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

# मनोगत

१९७९–८० या वर्षात मराठीच्या गौरवाचा एक वेगळाच आविष्कार महाराष्ट्राने अनुभवला. महाराष्ट्र शासनाने हे वर्ष राजभाषा वर्ष म्हणून समारंभपूर्वक पाळले. आजवर मराठीचा विचार शासन व्यवहारापुरताच केला जात होता. शासन व्यवहाराची भाषा सोपी असावी, तिच्यात नेमकेपणा असावा, सूक्ष्म अर्थछटा व्यक्त करण्यास ती समर्थ असावी, अन्य भारतीय भाषांशी ती मिळतीजुळतीही असावी, अशा एकाच वेळी अनेक अपेक्षा बोलून दाखवल्या जात होत्या. या अपेक्षा प्रचलित मराठीचे स्वरूप व विविध विषयांच्या अनुषंगाने तयार करावी लागणारी परिभाषा यांच्या संदर्भात कितपत पुऱ्या होऊ शकतील हा प्रश्न परिभाषा-निर्मितीचे कार्य करणाऱ्यांना नेहमीच पडतो. राजभाषा वर्षात या भाषिक प्रश्नाला वेगळेच परिमाण लाभले. शासन व्यवहार हे लोकव्यवहाराचे एक अंग आहे. प्रशासनाबरोबरच अन्य क्षेत्रांतही मराठीच्या विकासाला चालना मिळावी, तिची दिशा ठरावी यादृष्टीने या वर्षात विविध स्वरूपाचे कार्यक्रम हाती घेण्यात आले. मुंबई, नागपूर, पुणे, औरंगाबाद, कोल्हापूर अशा प्रमुख ठिकाणी परिसंवाद, चर्चासत्रे, सभा आयोजित केल्या. आकाशवाणी, दूरदर्शन या माध्यमांद्वारे राज-

भाषेच्या संदर्भातील विचार लोकांपर्यन्त पोचविले. " लोकराज्य " या शासकीय पाक्षिकाचा दर्जेदार विशेषांक काढून मराठीला परिपोषक असे नामवंतांचे लेख संग्रहित केले. वृत्तपत्रांनी बहुमोल कामगिरी बजावली.

चर्चासत्रांतून आणि परिसंवादांतून, भाषाशास्त्र व समीक्षा, साहित्य व संस्कृती, विज्ञान व तंत्रज्ञान, विधी व न्याय आणि मुद्रण अशा विविध क्षेत्रांतील व्यासंगी विद्वानांनी मराठीच्या विकासाच्या दिशा, तिचे नियोजन व अभिवृद्धी याविषयीचे आपले विचार ठिकठिकाणी मांडले. या विचारमंथनातून मराठीचे अंगभूत सामर्थ्य जसे स्पष्ट झाले तशाच तिच्या अभिव्यक्तीच्या मर्यादाही लक्षात आल्या. आजचा शासन व्यवहार हा सर्वस्पर्शी झालेला आहे. शासनाचा संबंध नाही असे एकही क्षेत्र नाही. लोकशाहीत हें अपरिहार्यच आहे. लोकांच्या भाषेला आता राजभाषेची प्रतिष्ठा मिळाली आहे. त्यामुळे शासनाशी संबंधित अशा प्रत्येक क्षेत्रात राजभाषा मराठीचा वापर होऊ शकेल, आधुनिक संकल्पना स्पष्ट होतील अशा प्रकारे तिच्यातील शब्दसंग्रह समृद्ध करावयाचा आहे. खऱ्या अर्थाने तिची क्षमता वाढवायची आहे. विषयानुरूप मराठीतील शब्दसंपत्ती वाढवण्याचे प्रयत्न आता शासकीय पातळीवरूनही जोमाने चालू झाले आहेत ही खरोखरी फार समाधानाची गोष्ट आहे.

१ मे १९६० रोजी महाराष्ट्र अस्तित्वात आला असला तरी मराठी राजभाषेचे पर्व हे खऱ्या अर्थाने २६ जानेवारी १९६५ रोजी सुरू झाले. त्या दिवसापासून राजभाषेचा कायदा अंमलात आला व त्याच्या अंमलबजावणीची प्रक्रिया सुरू झाली. महाराष्ट्रात १९६५ पासून सुरू झालेले हे राजभाषेचे पर्व कितपत यशस्वी ठरले हे जोखण्यास १९७९–८० चे राजभाषा वर्ष चांगलेच उपकारक ठरले. वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहिल्यास, राजभाषेच्या प्रगतीसाठी शासनाने हाती घेतलेले बहुतेक उपक्रम यशस्वी ठरले असल्याचे दिसून येईल. राजभाषा वर्षाच्या निमित्ताने, त्या वर्षात निरनिराळ्या क्षेत्रांतील मान्यवरांनी लिहिलेल्या लेखांचे संकलन करून ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध करणे अधिक उपयुक्त होईल असे वाटले. त्याप्रमाणे आता हे पुस्तक वाचकांच्या हाती देताना मला आनंद वाटतो.

सदर लेख प्रसिद्ध करण्यास परवानगी दिल्याबद्दल संबंधित लेखकांचा मी अत्यंत आभारी आहे. कै. प्रा. नरहर कुरुंदकर यांचा लेख पुस्तकात घेताना ते आज आपल्यात नाहीत ही जाणीव अतिशय दु:खद आहे. या संग्रहाचे त्यांनी निश्चितच सहर्ष स्वागत केले असते. चोखंदळ आणि जिज्ञासू वाचक 'मंथन'चे स्वागत करतील असा मला विश्वास वाटतो.

**मुख्य मंत्री**
महाराष्ट्र राज्य.

# भाषा सल्लागार मंडळाची भूमिका : शासन व्यवहारातील मराठी

१९५६ मध्ये भाषावार राज्य पुनर्रचना झाली, परंतु त्या त्या राज्यांमध्ये लोकभाषांना राजभाषा म्हणून अद्याप पूर्ण प्रतिष्ठा लाभलेली नाही ही वस्तुस्थिती आहे. अजूनही शासन व्यवहारात इंग्रजीला पुष्कळ प्रतिष्ठा आहे. महाराष्ट्रातच नाही तर इतर राज्यांतही राजभाषेबाबत हीच परिस्थिती आहे.

महाराष्ट्रात मराठीला लोकशाही राजवटीशी सुसंगत असे रूप देण्याचे शास्त्रशुद्ध प्रयत्न १९६० पासून म्हणजे महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेपासून करण्यात आले आहेत. मराठीचा शासन व्यवहाराची भाषा म्हणून विकास घडवून आणण्यासाठी महाराष्ट्र शासनाने १९६० मध्ये भाषा संचालनालयाची स्थापना केली व मराठीतील नामवंत कोशकार, भाषा-तज्ज्ञ, पत्रकार, प्राध्यापक व समाज प्रबोधक यांचे एक भाषा सल्लागार मंडळ नेमले. या सल्लागार मंडळाच्या मार्गदर्शनाखाली शासन व्यव-हारातील मराठीची जडणघडण करण्याचे काम सुरू झाले. या राज्यातील विविध हुद्द्यांचे मराठीकरण करण्याचा कार्यक्रम मंडळाने प्रथम हाती

घेतला. ब्रिटीश अमदानीत काही सरकारी पदनामे मराठीत रूढ असली तरी बहुतांश पदनामे ही इंग्रजी होती. शासन व्यवहाराची भाषा मराठी करावयाची म्हटल्यानंतर सर्वप्रथम पदनामांचे मराठीकरण आवश्यकच होते. सरकारी पदनामांचे मराठी पर्याय ठरवण्यासाठी केंद्र सरकारचे एकरूप परिभाषेचे धोरण विचारात घेऊन काही मूलभूत तत्त्वांचा अवलंब करणे अपरिहार्य होते. मराठी भाषेचे स्वरूप लक्षात घेता केवळ संस्कृताधिष्ठित शब्दच पदनामासाठी निवडणे भाषा सल्लागार मंडळाला मान्य नव्हते. संस्कृताप्रमाणेच, उर्दू, फारशी व इंग्रजी अशा विविध भाषांतील आधीच रूढ असलेल्या कित्येक शब्दांचा यावेळी भाषा सल्लागार मंडळाने पुरस्कार केला आणि महाराष्ट्रातील राजपत्रित व अराजपत्रित अशा सर्वच पदांचे मराठीकरण केले. रूढ शब्द डावलून नवीन शब्द तयार मंडळाला केल्यास भाषेत कृत्रिमता निर्माण होते याची जाणीव भाषा सल्लागार होती. पदनाम कोशाला त्यावेळचे मुख्य मंत्री माननीय श्री. यशवंतराव चव्हाण यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत या गोष्टीचा उल्लेख आला आहे. पदनाम कोशास अंतिम स्वरूप देण्यापूर्वी त्याच्या मर्यादित प्रती छापून अभिप्राय व सूचना मागवण्याच्या दृष्टीने त्या मंत्रालयीन विभाग व अन्य सरकारी कार्यालये, प्रमुख वृत्तपत्रे आणि महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील मराठीकरणाविषयी आस्था असलेल्या मान्यवर विद्वान व्यक्ती यांच्याकडे पाठवण्यात आल्या होत्या. पदनाम कोशातील पदनामे मुख्यत्वेकरून ज्यांना हरघडी वापरायची आहेत व पर्यायांच्या अर्थव्याप्तीविषयी ज्यांना अचूक कल्पना आहे अशा सरकारी कार्यालयातील अधिकाऱ्यांनी आपापल्या विभागातील पदनामे समर्पक असल्याचा सामान्यतः निर्वाळा दिला होता. ज्या काही सूचना त्यांनी व इतर व्यक्तींनी केल्या त्यांचा भाषा सल्लागार मंडळाने अगत्याने विचार केला. मराठी भाषेच्या प्रकृतीशी व परिभाषेच्या शास्त्रशुद्ध तत्त्वांशी सुसंगत होतील व निश्चित अर्थ योग्य रीतीने व्यक्त करू शकतील असेच पर्याय निवडण्याचे मंडळाचे धोरण होते. त्यानुसार सर्व अभिप्रायांची छाननी करून भाषा सल्लागार मंडळाने पदनाम कोशाला अंतिम स्वरूप दिले व हा कोश १९६२ मध्ये प्रसिद्ध करण्यात आला.

पदनाम कोशातील पदनामे ही केवळ संस्कृतनिष्ठ नाहीत हे उघड उघड पाहिले तरी दिसून येईल. येथे "Painter" याला "रंगवाला", "Oilman" याला "तेलवाला", "Fitter" ला "जोडारी", "Glazier" ला "काच कारागीर" "Greaser" ला "वंगणगार", तसेच "Security" ला "सुरक्षा" "Peon"ला "चपराशी", "Blacksmith"ला "लोहार" व "Carpenter"ला "सुतार", "Head Constable" ला "हवालदार", "Company Orderly" ला "कंपनी अडली" असे म्हटले आहे. "Bench clerk" ला "शिरस्तेदार", "Artist" ला "चित्रकार", "medical Officer" ला "वैद्यकीय अधिकारी", "mason" ला "गवंडी" असे सोपे व रूढ पर्याय वापरले आहेत. "मिस्त्री", "खानसामा" यासारखी रूढ पदनामे तशीच ठेवण्यात आली आहेत. वरील सर्व उदाहरणांवरून मराठीत रूढ असलेली पदनामे टाळण्याचे भाषा सल्लागार मंडळाचे धोरण नव्हते हे दिसून येईल. परंतु ज्या इंग्रजी पदनामांना मराठीत रूढ पर्याय नव्हते अशा पदनामांकरिता नवीन शब्द बनवावे लागले. हे शब्द योजताना अर्थातच मराठीतील नवे शब्द करण्याच्या रूढ पद्धतीचा अवलंब करावा लागला. आवश्यक तेथे भाषेत चपखल बसतील अशा शब्दांचा वापर करावा लागला. पुष्कळदा असे करताना संस्कृताचाही आधार घ्यावा लागला. कारण मराठीची तशी परंपरा होती व मुख्य म्हणजे मराठीच्या प्रकृतीस ते मानवणारेही होते. उदाहरणार्थ "इंजिनियर"हा शब्द. इंजिनियर हे पदनाम जसेच्या तसे ठेवणे इष्ट होईल काय, याबद्दल भाषा सल्लागार मंडळाने बराच विचार केला आणि शेवटी त्या शब्दाला "अभियंता" असा पर्याय घेतला. भारत सरकारनेही हाच पर्याय घेतला आहे व गेल्या पंधरावीस वर्षाच्या वापरामुळे तो कागदोपत्री व व्यवहारात रूढ झाला आहे. अभियंता या शब्दाऐवजी "इंजिनियर" हाच शब्द तो बोलभाषेत रूढ आहे म्हणून घेण्याचा काही मंडळी आता नव्याने आग्रह धरीत आहेत. लिहिण्याच्या भाषेचीही एक ढब असते. ही गोष्ट विचारात घेता भाषेतील कोणते शब्द भाषेची घडण न बिघडवता स्वीकारता येतील हे पाहिले पाहिजे. भाषा सल्लागार मंडळाने याबद्दल बारकाईने विचार केला होता आणि स्टेशन,

टेबल, रेडिओ, पोलीस, कंपनी, बिल, अपील, लायसन इत्यादी अनेक शब्द शासन व्यवहारात व इतरत्र स्वीकारण्याची शिफारस केली होती. त्याप्रमाणे ते स्वीकारण्यातही आले आहेत. इंजिनियर शब्द जशाचा तसा घेतल्यास त्याच्या जवळपासच्या पदनामांबद्दल आपण काय करणार ? असिस्टंट इंजिनियर, डेप्युटी इंजिनियर, सुपरिंटेंडिंग इंजिनियर असे म्हणणार की सहाय्यक इंजिनियर, उप इंजिनियर, अधीक्षक इंजिनियर असे म्हणणार. कारण अन्यत्र असिस्टंट, डेप्युटी, सुपरिंटेंडिंग इत्यादी शब्दांबद्दल सहाय्यक, उप व अधीक्षक हे पर्याय स्वीकारण्यात आले आहेत. असे शब्द भाषेचे सौंदर्य बिघडवणार नाहीत काय याचा विचार करणे भाषा सल्लागार मंडळाला भाग पडले होते. इंजिनियर शब्द रूढ आहे म्हणून जशाचा तसा घेतला तर मग " इंजिनियरिंग " या शब्दाचे काय करावयाचे? तोही जशाचा तसा घेणे इष्ट होईल काय ? हा शब्द जर जशाचा तसा घेतला तर इतरही अनेक शब्द तसेच घ्यावे लागतील. तसे जर केले तर मग नवीन परिभाषा करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. म्हणूनच भाषा सल्लागार मंडळाने याबाबतीत पूर्ण विचार करून अखेरीस " इंजिनियर " या शब्दाबद्दल " अभियंता " या शब्दाची शिफारस केली होती. केवळ संस्कृतनिष्ठ शब्दांची हौस म्हणून हा शब्द घेण्यात आला नाही तर नवीन यंत्रयुगातील विविध संकल्पनांना मराठीत सामावून घेण्यासाठी अभियंता, अभियांत्रिकी इत्यादी मराठीच्या प्रकृतीला जुळणारे व नेमका अर्थ व्यक्त करणारे शब्द भाषेत रुजू करून घेणे आवश्यक होते. अभियंता हा शब्द आता थेट तळापर्यन्त जाऊन पोहोचला आहे व ग्रामीण विभागातील पंचायत समितीच्या कार्यालयांतही " उप अभियंता " वा " सहाय्यक अभियंता " हे शब्द वापरात आहेत. वृत्तपत्रांतही हा शब्द सर्रास वापरला जातो. ग्रामीण भागात आता कोणीही डेप्युटी इंजिनियर किंवा असिस्टंट इंजिनियर असे म्हणत नाही. उप अभियंता किंवा सहाय्यक अभियंता असे म्हणतात. भाषा सल्लागार मंडळाने तयार केलेले असे अनेक शब्द महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात जाऊन ठेपले आहेत. शब्द केवळ संस्कृत आहे म्हणून तो ग्रामीण स्तरावर समजणार नाही ही समजूत बरोबर नाही.

" संकरित " हा शब्द संस्कृत आहे. परंतु आज महाराष्ट्रातील कोणत्याही खेड्यात तो वापरला जातो व त्याचा अर्थ तेथे सर्वांना समजतो. संकरित ज्वारी, संकरित बियाणे हे शब्द ज्या वर्गांना त्याची माहिती आवश्यक आहे त्या वर्गांना निश्चितपणे कळतात व ते लोकही आपल्या तोंडी व लेखी व्यवहारात या शब्दांचा कटाक्षाने वापर करतात.

आधुनिक शासन व्यवस्था ही सर्वस्पर्शी झाली असल्यामुळे शासनाच्या बहुतेक सर्वच विभागांमध्ये काही प्रमाणात शास्त्रीय व तांत्रिक शब्दांचा वापर करावा लागतो. त्यामुळे शासन व्यवहार कोशामध्ये असे बरेच शब्द घेण्यात आले आहेत. यापैकी काही शब्द सर्वसाधारण जनतेला दुर्बोध वाटण्याची शक्यता नाकारता येत नाही. पण तेवढ्यामुळे शासकीय मराठी दुर्बोध होईल असे म्हणता येत नाही. शासन व्यवहारातील दुर्बोध-तेचे खरे कारण म्हणजे अजूनही शासन व्यवहारात मराठीचा मुळात वापर होत नाही. जो काही वापर होतो तो दुय्यम भाषेच्या स्वरूपात, म्हणजे मूळ इंग्रजी मसुद्याचे मराठी भाषांतर करण्यासाठी होतो. या भाषांतर प्रक्रियेमध्ये इंग्रजी शब्दांना प्रतिशब्द, त्यांच्या अर्थछटांचा विचार न करता योजण्यात येतात. मराठी वाक्यरचनाही इंग्रजी धर्तीची ठेवण्यात येते. त्यामुळे हे मराठी, कृत्रिम व परके वाटते. परंतु ही गोष्ट ध्यानात न घेता बहुसंख्य लोक शासनाची मराठी दुर्बोध आहे व शासनाने नव्याने केलेले काही शब्द दुर्बोध आहेत अशी धारणा करून बसतात. वस्तुस्थिती अशी नाही. ३० हजार शब्दसंख्येच्या शासन व्यवहार कोशामध्ये संस्कृत-निष्ठ व बोजड असे फारतर हजार एक शब्द निघू शकतील.

शब्द कितीही सोपे व सुटसुटीत असले पण त्यांचा वापर जर जाणतेपणी केलेला नसेल तर कोणतीही भाषा ही बोजडच वाटेल. सरकारी मराठी अनेकदा बोजड वाटते त्याचे कारण हेच आहे. तेथे मूळ इंग्रजीचे भाषांतर करण्यात येते. हे भाषांतर करताना मराठी शब्द ठोकळेबाजपणे वापरण्यात येतात. अभिप्रेत अर्थ ते वाक्यामध्ये आणू शकतील किंवा नाही याचे तारतम्य ठेवण्यात येत नाही. या ठिकाणी बराचसा दोष मूळ शब्द तयार करणाराचा नसून त्यांचा गैरवापर करणारांचा असतो.

आतापर्यन्त भाषा सल्लागार मंडळाने भाषा संवर्धनाचे केलेले प्रयत्न आपल्या परीने शास्त्रशुद्ध असेच आहेत. या प्रयत्नांचा परिपाक म्हणून आज सकृत्दर्शनी दुर्बोध वाटणारे पण खरोखर तसे नसणारे अनेक शब्द वापरात आले आहेत. हे शब्द रूढ करण्यात संपर्क माध्यमे म्हणजे आकाशवाणी, दूरदर्शन व वृत्तपत्रे यांनीही आपला वाटा उचलला आहे. वृत्तपत्रे हे शब्द जनतेपर्यन्त नेऊन पोहोचविण्याचे कार्य करीत आहेत. आदेश काढून भाषा रूढ होत नाही. ती लोकांच्या मनीमुखी बसण्याइतकी सोपी व सुटसुटीत असायला हवी अशी भाषा सल्लागार मंडळाची भूमिका आहे.

# अनुक्रमणिका

# भारतीय भाषांचा विकास व सांस्कृतिक समस्या

**भा**षांच्या विकासाचा प्रश्न विचारात घेताना मी काही प्राथमिक बाबी नजरेसमोर ठेवतो. आपणच आग्रहपूर्वक स्वीकारलेल्या निर्णयाचे परिणाम भोगताना आपणच कुरकुर करावी ही बाब मला समर्थनीय वाटत नाही.

पहिला प्रश्न असा आहे. साठ वर्षे मागणी-सत्याग्रह, लढा, इत्यादी इत्यादी मार्ग स्वीकारीत, अवलंबीत आपण स्वातंत्र्यलढा चालविला व स्वतंत्र झालो. ह्या स्वातंत्र्यलढ्याच्या काळात आपण लोकशाहीचा तत्त्व म्हणून, ध्येय म्हणून स्वीकार केला. स्वतंत्र भारतात लोकशाही शासन व्यवस्था आली. जनतेच्या सार्वभौमत्वाचा स्वीकार हे चित्र जर आपण आग्रहाने प्रतिपादन केले, स्वीकारले तर जनतेच्या भाषेतून प्रशासन व त्यासाठी भाषावार प्रांतरचना ह्या बाबी आपण मान्य केल्या पाहिजेत. भाषावार प्रांतरचना हवी यासाठी लढा द्यायचा, महाराष्ट्र मिळवायचा व महाराष्ट्र मिळाल्यानंतर पुन्हा एकदा भाषावार प्रांत-रचना करणे बरोबर की चूक हा प्रश्न उपस्थित करायचा हे बरोबर नव्हे.

आपण विचार करताना ‘ लोकशाही म्हणजे जनतेचे राज्य, जनतेचे राज्य जनतेच्या भाषेतूनच असणार. सबब भाषावार प्रांतरचनेला लोकशाहीत पर्याय नाही ’ हे सूत्र ध्यानात ठेवूनच विचार केला पाहिजे.

### तीन परस्पर–संलग्न प्रश्न

भाषावार प्रांतरचनेने आपणासमोर परस्पर-संलग्न असे तीन प्रश्न उभे केलेले आहेत. प्रथम म्हणजे सर्व प्रशासनव्यवहार मराठी भाषेतून चालवणे शक्य होईल इतका मराठीचा विकास झाला पाहिजे. कन्नड, गुजराथी, बांगला, तेलुगू ह्यांच्यासमोर तर हा प्रश्न आहेच पण तामीळ-समोरही हा प्रश्न उभा आहे. आधुनिक काळात शासन हे फक्त शांतता व रक्षण इतकेच कार्य करत नाही. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत शासनाचा सहभाग असतोच. त्यामुळे ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांतील शब्द शासनाला वापरणे भाग असते. “तुमच्या इलेक्ट्रिक वायरच्या कारखान्यास इम्पोर्टेड वा तांब्याचे लायसेन्स द्यावे की नाही, हा प्रश्न विचाराधीन आहे”— असे लिहायचे नसेल तर मग प्रतिशब्द हवेत आणि ते सर्व क्षेत्रांतील हवेत. हे शब्द तयार करणे म्हणजे परिभाषा सिद्ध करणे. हा तर प्रश्न आहेच पण ही परिभाषा वापरणारा माणूस तयार करायचा असेल तर शिक्षणाचे माध्यमही मराठी हवे. हे मराठी माध्यम प्राथमिक शाळेपुरते असून चालणार नाही. सर्व शिक्षणाचे माध्यमच मराठी हवे. शिक्षणाचे माध्यम मराठी असल्याशिवाय प्रशासन मराठी होऊ शकणार नाही हा दुसरा प्रश्न आहे. आणि आपण भाषावार प्रांतरचना पत्करतो आहो. भाषिक राष्ट्रवाद पत्करीत नाही, एकात्म भारतीय राष्ट्रालाही आपणच वचन-बद्ध आहोत. म्हणून परिभाषा शक्यतो सर्व भारतभर एक करायला हवी हा तिसरा प्रश्न आहे. हे तीन प्रश्न एकमेकात गुंतलेले आहेत.

परिभाषा सिद्ध नाही म्हणून जनतेच्या भाषेत शिक्षण नाही, प्रशासन नाही आणि वापर नाही. अशी परिभाषा लवकर सिद्धही होत नाही; रुळतही नाही अशा कोंडीत आपण सापडलेलो आहोत. ही कोंडी फोडण्यासाठी तात्पुरत्या तडजोडी आपण अनेक करू शकतो,

करीत आहोत. प्रत्येक भाषेला स्वतंत्र परिभाषा करण्याची परवानगी, शिक्षणाचा विज्ञान-तंत्रज्ञान विभाग इंग्रजीतून चालविण्यास परवानगी, प्रशासनाचा व्यवहार शक्यतो मराठीत करण्याचे धोरण जाहीर करून प्रत्यक्षात शक्यतो व्यवहार इंग्रजीत करणे असे अनेक प्रकार चालू आहेतच. शिवाय गरज पडेल तेथे इंग्रजी शब्दाचा वापर करण्याची मुभा आहे : 'आपणांस टर्मिनेट करण्याची ऑर्डर दिलेली आहे'. हे वाक्य अलाउड आहे. तात्पुरता मार्ग म्हणून हे करण्यास हरकत नाही, पण अंतिमत: सर्वत्र मराठी परिभाषा सिद्ध करणे भाग आहे. या ठिकाणापर्यंत येताच वादाचे प्रश्न सुरू होतात. प्रथम म्हणजे देशी भाषांच्या स्वीकारामुळे आपण जगाच्या मागे पडू, अद्ययावत ज्ञानापासून आपण तुटून जाऊ. दुसरे म्हणजे प्रांतभाषेच्या आग्रहामुळे राष्ट्रीय एकात्मतेस तडा जाईल. तिसरे म्हणजे परिभाषा निर्मितीमुळे भाषा क्लिष्ट, दुर्बोध होऊन तिचे सौंदर्य मावळेल. चौथे म्हणजे सर्व परिभाषेला संस्कृतचा आधार काय म्हणून? ख्रिश्चन, मुसलमान, द्रविड, आदिवासी यांना पुरेसे महत्त्व नको काय? खरे म्हणजे दारिद्र्यनिवारणासारखा तातडीचा अजस्त्र प्रश्न सोडून असल्या भाषाविषयक प्रश्नांना आजच प्राधान्य देण्याची गरज काय? इत्यादी इत्यादी. हे प्रश्न उपस्थित करताना सर्व मागचा-पुढचा विचार केलेला असतोच असे नाही. या वादाच्या प्रश्नातच भाषाशुद्धी हाही एक प्रश्न आहे. भाषाविकासातील सांस्कृतिक प्रश्न म्हणून जे मानले जातात त्यांपैकी काही हे आहेत.

### सगळे ज्ञान इंग्रजीत आहे हा मोठा भ्रम

यावावत प्रथम आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, जगातले सगळे ज्ञान इंग्रजीत आहे हा फार मोठा भ्रम आहे. तंत्रज्ञान आणि विज्ञान यांसाठी भारतीयांना अमेरिकेखेरीज जपान, रशिया, जर्मनी इकडे धाव घेणे भाग आहे. तेव्हा इंग्रजीवर निर्वाह चालणार नाही. इंग्रजीतून रशियन भाषा शिकणे आणि हिंदी-मराठीतून रशियन भाषा शिकणे यात फार फरक पडत नसतो. जगातले एक मोठे प्रमुख राष्ट्र म्हणून जगातल्या

सगळ्याच भाषा आपणासाठी आवश्यक आहेत. पण हे कार्य एखादा टक्कासुद्धा नसणाऱ्यांपुरते आहे; त्यासाठी ९९ टक्के जनतेला शिक्षा नसावी. इंग्रजीत जगाचे ज्ञान आहे. इंग्रजीमुळे आपण जगाच्या बरोबर राहू. इंग्रजी तुटली की आपण मागे पडू. या सर्व वाक्यांचा खरा अर्थ १०० वर्षे भारतावर इंग्रजांचे राज्य होते. त्यांनी इंग्रजी लादली ती आता सवयीची झाली आहे. ही सवय सोडावी असे वाटत नाही इतकाच आहे.

हिंदीसारखीच सर्व देशी भाषांची गत आहे, म्हणून कोणतीही देशी भाषा नको. प्रशासन इंग्रजीतून हवे. सर्व उच्च शिक्षण इंग्रजीतून हवे. हा मुद्दा खरा. इंग्रजी-हिंदी नको. हिंदी तर नकोच नको. सर्व तामीळ हवे. असा जर कुणाचा आग्रह असता तर ही मंडळी तामीळ प्रांतरचनेला राष्ट्ररचनेचा दर्जा देत आहेत असे तरी म्हणता आले असते. पण हिंदी नको, तामीळ तर नकोच नको; इंग्रजी हवे. ही भूमिका मुळात जनतेच्या राज्यविरोधी म्हणजे लोकशाहीविरोधी आहे. वाद हिंदी विरुद्ध इंग्रजी असा मानला जातो. पण खरा वाद सर्व देशी भाषा, तिच्यातून व्यवहार करणारी जनता विरोधी विदेशी भाषा व तिच्या आधारे प्रमुख बनलेला हितसंबंध, त्या भाषेत गुंतलेला वरिष्ठ वर्ग असा आहे. हे आपण समजून घेतले पाहिजे. सर्व जनता व सर्व राष्ट्रवाद यांना तुच्छ समजण्याची ही वृत्ती आहे.

## अनाठायी भीती आणि आक्षेप

प्रांतभाषांच्या आग्रहामुळे राष्ट्रीय एकात्मतेस तडा जाईल ही समजूत-सुद्धा अशीच खोटी आहे. प्रांतभाषा आणि राष्ट्रभाषा यांच्यात विरोध नाही हीच हिंदीच्या कडव्या पुरस्कर्त्यांचीसुद्धा भूमिका आहे. हिंदीतून बोला अगर मातृभाषेतून, या मागणीमागे तत्त्व हेच आहे. राष्ट्रभाषा हिंदीसह सर्व प्रांतभाषा मिळून देशी भाषा होतात व त्यांचा सर्वांचा विकास परस्पर-संलग्न आहे. हिंदीसाठी असणारी परिभाषा सर्व देशी भाषा स्वीकारू शकतात. देशी भाषा काय किंवा हिंदी काय परिभाषा विकसित करण्यासाठी त्यांना संस्कृतचा एकच समान आधार आहे.

एका मर्यादेनंतर प्रांतभाषांचा विकास हिंदीला उपकारकच ठरतो. प्रांतभाषांच्या विकासामुळे राष्ट्रीय एकात्मतेस तडा जाईल अशी भीती बाळगण्याचे कारण नाही.

परिभाषा क्लिष्ट व दुर्बोध आहे. त्यामुळे भाषेचे सौंदर्य बिघडेल हा आक्षेप असाच अनाठायी आहे. शब्द जेव्हा अपरिचित असतात तेव्हा बेढब व हेंगाडे वाटतात. ते सारखे वापरात येत राहिले म्हणजे रुळतात, परिचित होतात. आपण शब्द वापरून रुळण्याची, परिचित होण्याची संधी तर द्यायला हवी. ती देण्यापूर्वीच सगळ्या चर्चा आपण करीत राहतो. सर्वसामान्यपणे भाषेची ही प्रवृत्तीच आहे की, एक अर्थ सांगण्यासाठी अनेक शब्द असतात. एका शब्दाचे अनेक अर्थ असतात. प्राय: समान अर्थ असला तरी छटांचे फरक दाखविणारे शब्द असतात. सगळ्याच भाषांची ही पद्धत आहे. मराठीतही ह्या साऱ्या प्रवृत्ती आहेतच. परिभाषा निर्माण करताना यापेक्षा निराळी दिशा स्वीकारावी लागते. शब्दांचे अर्थ नेमके व निश्चित असावेत अशी काळजी घ्यावी लागते. शब्दांचे परस्परावलंबित्व विचारात घ्यावे लागते. आपण एक उदाहरण घेऊ. प्राथमिक, माध्यमिक शाळा, त्यांचे मास्तर, शिक्षण खाते, कॉलेज, विद्यापीठ ह्या साऱ्यांचे बोधक शब्द कसे बनवणार? शिक्षण-शिक्षक, शिक्षणशास्त्र, शिक्षण खाते, शैक्षणिक कार्य, असे शब्द आपण वापरणार असू तर गुन्ह्याबद्दल शिक्षा ही कल्पना सोडून देऊन तिथे दंड, हा निराळा शब्द वापरावा लागतो. त्यानुसार दंड, दंडनीय, दंडाधिकारी, दंडकक्षा असे शब्द बनवावे लागतात. परिभाषा जेव्हा प्रशासन, न्यायविज्ञान व तंत्रज्ञान या क्षेत्रांत वापरली जाते तेव्हा नेमक्या व रेखीव अर्थाची अपेक्षा असते. मनिऑर्डरला द्रव्याज्ञा म्हणायचे तर चेकला काय म्हणायचे? ड्राफ्टला काय म्हणावे? असा प्रश्न तिथे निर्माण होतो. या बाबीचा विचार केला तर परिभाषेबाबत दोन बाबी स्पष्ट होतील. परिभाषा कृत्रिम-रीत्याच बनवावी लागते. आणि ती रुळवावी लागते. स्वभावक्रमात निर्माण होणाऱ्या शब्दांची ती नसते.

परिभाषेत केवळ एक शब्द महत्त्वाचा नसतो तर इतर अनेक शब्द त्या एका शब्दावर आधारित असतात. व्यवहारात रुळलेले शब्दच वापरावे असा आग्रह परिभाषेत उपयोगी नसतो. अनेकांच्या मनात काही गमतीदार समजुती आहेत. त्यांना संस्कृत भाषा व हिंदू धर्म एकरूपच वाटतात. परिभाषेला संस्कृतचा आधार म्हणजे हिंदू धर्माचे पुनरुज्जीवन, ब्राह्मणांची वर्णश्रेष्ठता, विषम समाजरचनेची पूजा, प्रतिगामी मनोवृत्ती असा क्रम त्यांच्या मनात उगीचच बलवान होऊन बसलेला असतो. लॅटिन आणि ग्रीकचा आधार घेऊन इंग्रजी परिभाषा बनते. त्यावेळी प्रश्न शब्दांचा असतो. सीझरच्या राजवटीचे पुनरुज्जीवन होत नाही हे उघडच आहे. तसे पाहिले तर समता, न्याय, स्वातंत्र्य या शब्दांनाही आधार संस्कृतचाच आहे. शब्द निर्माण करण्यासाठी संस्कृतचा आधार म्हणजे हिंदुत्वाचा आधार नव्हे. भाषा आणि धर्म एकरूप नसतात हे समजून घेतले पाहिजे. परिभाषेच्याबाबत आपण दोन भूमिका घेऊ शकतो. एक तर आहेत ते शब्द आपल्या भाषेत मान्य करण्याचा मार्ग आहे. हा मार्ग पत्करला तर हजारो युरोपियन शब्द जसेच्या तसे देशी भाषांमध्ये स्वीकारावे लागतील. तात्पुरता व्यवहार चालू ठेवण्यासाठी हा मार्ग स्वीकारला तरी त्यामुळे देशी भाषांचा विकास होणार नाही. दुसरा मार्ग अखिल भारतीय सामान्य परिभाषा संस्कृतच्या आधारे निर्माण करण्याचा आहे. धर्माने मुसलमान असणारे लोक पाकिस्तानमध्ये जी उर्दू भाषा बोलतात तिच्यातही शेकडा ६० शब्द संस्कृतोद्भव आहेत. भारतीय उर्दूत तर हे प्रमाण अधिकच आहे. तामीळ, मल्याळमसारख्या द्रविड भाषांमध्येसुद्धा परिभाषा, शास्त्र व तत्त्वज्ञान संस्कृतच्या आधारे स्पष्ट केले जाते. परिभाषेसाठी सर्वांनाच संस्कृतचा आधार घेणे भाग आहे. याला पर्याय नाही हे आपण समजून घेतले पाहिजे.

भाषेचा व्यवहार हा एका बाजूने, व्यवहार सुव्यवस्थित चालावा यासाठी असतो. दुसऱ्या बाजूने नेमकेपणा साधावा यासाठी असतो. याबाबत शुद्ध आणि अशुद्ध या आग्रहाचे प्रयोजन नाही. एखादा शब्द संस्कृत्-मध्ये कोणत्या अर्थाने वापरला जातो हा प्रश्न गौण आहे. हा शब्द आज

आपण कोणत्या अर्थाने वापरतो हा प्रश्न महत्त्वाचा आहे. नाहीतरी उत्क्रांती हा शब्द जुने शास्त्री-पंडित मरण या अर्थाने वापरीत. तो अर्थ आपण सध्या पत्करलेला नाही. परिभाषा संस्कृतच्या अर्थाने बनविणे आणि शब्दांचे संस्कृतमधील जुने अर्थच टिकवून ठेवणे ह्या दोन बाबी भिन्न आहेत.

माझे हे विवेचन फक्त स्थूल दिशा दाखविणारे आहे. गुंतागुंत नाकारणारे नाही, इतके ध्यानात असावे.

# न्यायालयीन व्यवहार व मराठी भाषा

**मी** व्यवसायाने न्यायाधीश आहे आणि न्यायाधीशाने दोन्ही बाजूंचे म्हणणे ऐकून निकाल द्यावयाचा असतो. न्यायाधीशाला आपले स्वत:चे मत असू नये असे आपण मानतो. मत असले तरी त्याने मत-प्रदर्शन करू नये असा दंडक आहे. म्हणून मी केवळ सहचिंतनाच्या भूमिकेवरून राजभाषेच्या प्रश्नांच्या काही पैलूंचा विचार करणार आहे.

अशी एक जुनी गोष्ट सांगतात की, एकदा एक परिषद भरवली गेली होती. त्यात अनेक तज्ज्ञ, विशेषज्ञ, ज्यांना आपण स्पेशालिस्ट, एक्सपर्ट म्हणतो ते हजर होते. हा याचा तज्ज्ञ , तो त्याचा विशेषज्ञ अशी प्रत्येकाची ओळखही करून देण्यात आली. परिषद कशासाठी भरली, अशी विचारणा केली असता असे सांगण्यात आले की, सामान्य माणसाच्या सुखाचा विचार करण्यासाठी ही तज्ज्ञांची परिषद भरली आहे. म्हणून अध्यक्षांनी शवटी असा प्रश्न उपस्थित केला की, ज्या सामान्य माणसाच्या सुखाचा विचार व्हावयाचा आहे त्यांच्यापैकी कुणी परिषदेला हजर आहेत काय ? उत्तर मिळाले की, ते सारे गैरहजर आहेत. बहुधा सामान्य माणसाच्या सुखाचा

विचार करावयास भरणाऱ्या प्रत्येक परिषदा व परिसंवाद यात सामान्य नागरिक हा असाच गैरहजर असतो. असाच काहीसा प्रकार राजभाषेच्या बाबतीतही होऊ पहात आहे.

आपल्या देशात भाषेचा प्रश्न हा फार गुंतागुंतीचा आणि जटिल झालेला आहे. या देशात लिपीलाही भाषा मानणारे लोक आहेत. इतरत्र संपूर्ण देशाची एकच भाषा असा प्रकार अस्तित्वात आहे. आपल्या देशात भाषा व लिपी यांचा संबंध अनेकदा संप्रदायाशीसुद्धा जोडला जातो. म्हणून भाषेच्या क्षेत्रात राजकारण व संप्रदायवाद यांचा प्रादुर्भाव होणार नाही याची काळजी घेणे आवश्यक आहे. भाषेचा संबंध ती भाषा बोलणाऱ्यांच्या संख्येशी जोडणे उचित नाही. भाषेचा संबंध भाषेच्या व्यापकतेशी असावयास हवा. विशिष्ट क्षेत्रातले सामान्यजन भाषांतरावाचून ज्या भाषेत परस्परांशी बोलण्याची धडपड करतात ती भाषा आपोआपच व्यापक होत जाते. खरे पाहिले तर, या देशात एक दिवस असा यावयास हवा की ज्या दिवशी या देशातील सामान्य नागरिक परप्रांतीय सामान्यजनांशी भाषांतरावाचून बोलू शकतील. भाषेचा विचार करताना हे लक्षात घेतले पाहिजे की, भारतीय संविधानाने फक्त भारतीय नागरिकत्वच मान्य केलेले आहे. प्रांतीय अगर इतर प्रकारचे असे दुहेरी नागरिकत्व राज्यघटनेला मान्य नाही. कुठलाही नागरिक आपल्या धर्माचा सभासद असला, आपल्या जातीतील व्यक्ती असली, विशिष्ट प्रांताचा रहिवाशी सुद्धा असला तरी तो कुठल्याही धर्माचा, जातीचा अगर प्रांताचा नागरिक नाही. नागरिकत्व फक्त भारतीय राष्ट्राचे आहे. आपल्या संविधानाला अभिप्रेत असलेली नागरिकत्वाची कल्पना ही अखिल भारतीय नागरिकत्वाची कल्पना आहे. त्याचप्रमाणे, भारतीय स्वातंत्र्याचे आंदोलन हे संपूर्ण स्वराज्याचे आंदोलन होते.

केवळ इंग्रजांच्या राजवटीतून भारत मुक्त व्हावा हा आंदोलनाचा संपूर्ण आशय नव्हे, सगळ्या प्रकारच्या दास्यातून मुक्त झालेला नवा स्वतंत्र माणूस निर्माण व्हावा व त्याने स्वत:चे भवितव्य ठरवावे हे स्वप्न स्वातंत्र्य आंदोलनात निहित होते. हे लक्ष्य पूर्ण व्हावयाचे असेल तर

जनतेच्या भाषेत राज्यकारभार चालणे केवळ हितावहच नव्हे तर आवश्यक आहे. जर राष्ट्र जनतेचे व्हावयाचे असेल व सामान्य नागरिक सत्तेत सहभागी व्हावा अशी आमची इच्छा असेल तर, जनतेच्या भाषेत राज्यकारभार चालणे ही आवश्यक बाब आहे.

## जनतेच्या भाषेतच राज्यकारभार हवा

लोकशाही यशस्वी होण्यासाठी जनतेच्या भाषेत राज्यकारभार चालावा ही मूलभूत व महत्त्वाची बाब आहे. भाषा म्हणजे केवळ निवेदनाचे साधन नव्हे, तर ते त्याहून अधिक खोलवरचे असे सत्य आहे. तो एक सांस्कृतिक एकांक आहे. भारतीय राष्ट्र या विविधतेतून निर्माण व्हावयाचे असेल तर या सांस्कृतिक गटांना आपल्या भाषेचा, संस्कृतीचा आणि जीवनाचा मुक्त अविष्कार करण्याची शक्य ती संधी उपलब्ध करून देणे भाग आहे. परंतु भाषिक स्वायत्तता म्हणजे भाषिक राज्यवाद व भाषिक साम्राज्यवाद नव्हे. भाषिक स्वायत्ततेतून भाषिक सहयोगाचा व आंतरभाषीय व्यवहाराचा मार्ग सुकर व्हावयास हवा. यातून संकुचितपणा निर्माण होऊन अखिल भारतीय नागरिकत्वाच्या भावनेला अडसर येणार नाही याची काळजी घ्यावी लागेल. न्यायालयांच्या बाबतीत हे अधिक महत्त्वाचे आहे कारण सर्वोच्च न्यायालयापासून कनिष्ठ न्यायालयांपर्यंत आपल्या देशाची न्यायप्रक्रिया एकजिनसी व एकात्म व्हावी लागेल, तेव्हाच खऱ्या अर्थाने कायद्याच्या राज्याचे आपले स्वप्न पूर्ण होईल.

तसे पाहिले तर प्रत्येक भाषा ही कुणाची तरी मातृभाषा असतेच. प्रत्येकजण आपल्या भाषेवर मातेप्रमाणेच प्रेम करतो. एवढे असूनही जन्मतःच कुणालाच कुठलीच भाषा येत नसते आणि मातृभाषा सुद्धा शिकवावी लागते. 'आई' म्हणणेही शिकावे लागते आणि 'मम्मी' म्हणणे हेही शिकावे लागते. अडचण निर्माण होते जेव्हा अनेक मातांपैकी सिंहासनावर कुणाला बसवावे हा प्रश्न निर्माण होतो तेव्हा! अशा वेळी ह्या सर्व माता व त्यांचे सुपुत्र यांचा सिंहासनासाठी संघर्ष सुरू होतो.

एकाची माता ही दुसऱ्याची 'विमाता' किंवा 'कुमाता' होत जाते. ती आई न राहता राणी होते आणि त्यातून गुंतागुंतीला सुरुवात होते. म्हणून, भाषिक अहंता व अभिमान भाषिक राष्ट्रवादापर्यंत तप्त होऊन अखिल भारतीय भावनेला धोका निर्माण होणार नाही याची काळजी घेणे आवश्यकच आहे. एका अर्थानें ही तारेवरची कसरत आहे.

परंतु शेवटी सामान्यजनांचा राज्यकारभारात सहभाग व्हावा असे वाटत असेल तर लोकभाषा ही राज्यकारभाराची भाषा व्हावी लागेल. ती बहुसंख्य लोकांची मायबोली आहे हा तिचा दोष नसून तो गुण आहे असेही मानावे लागेल. ती स्वाभाविक व नित्य विकसनशील असावी लागेल. भाषेचे स्वरूप असे असावे लागेल की, ती सर्वसामान्यांची भाषा होऊ शकेल. राज्यकारभाराची भाषा सर्वसामान्य माणसांची भाषा असल्याखेरीज त्यांच्या अभिव्यक्तीचे दर्शनच घडणार नाही. गुणात्मक लोकशाही स्थापन होऊन ती प्राणवान व्हावी असे वाटत असेल तर, सामान्य माणसाच्या अभिव्यक्तीची योजना त्यात असावी लागेल. त्याशिवाय कायद्याचे राज्यही संभवत नाही. सिंहासन रिकामे राहिले तरी चालेल पण त्यावर तुला बसू देणार नाही. 'राज़भाषेच्या किंवा राष्ट्रभाषेच्या देव्हाऱ्यात उंदरांनी धुडगुस घातला तरी चालेल, पण तिथे तुझ्या भाषेला स्थानापन्न होऊ देणार नाही ही भाऊबंदकीची परंपराही संपवावी लागेल.

**कायदा सर्वांना समजावा हा नैसर्गिक न्याय**

कायद्याच्या आपल्या विशिष्ट मर्यादा आहेत. कायदा आपल्या पायावर कधीच उभा राहात नाही. त्याला अंमलबजावणीसाठी सरकारवर अवलंबून असावे लागते. कायद्याच्या विरोधी असलेल्या गोष्टींपासून तो माणसाला परावृत्त करू शकेल; परंतु चांगले वागण्याची प्रेरणा देऊ शकत नाही. कायदा हक्क प्राप्त करून देतो. संधी उपलब्ध करून देतो, परंतु तो सामान्यजनांपर्यंत तोवर पोहोचत नाही, जोवर सामान्य नागरिकाच्या मताचे अधिष्ठान त्यास प्राप्त होत नाही. कायद्याचा दुसरा दंडक असा आहे की, मला कायदा माहीत नव्हता अशी सबब सांगून कुणीही

आपली कायदा मोडण्यापासून सुटका करून घेऊ शकत नाही. याचा अर्थ असा नव्हे की, प्रत्येकाला कायदा कळतो किंवा उमजतो किंवा माहिती असतो. परंतु कायद्याच्या क्षेत्रात असा बहाणा चालू दिला तर, त्या बहाण्याचे प्रत्युत्तर देणे कठीण असल्यामुळे मला कायदा माहीत नव्हता अशी सबब पुढे करून कुणाचीही कायद्यातून सुटका होऊ देणे कायद्याच्या राज्याच्या दृष्टीने हितावह नाही. मुंबईला असाधारण राजपत्रात रात्रौ १२ नंतर जरी कायदा प्रसिद्ध झाला तरी, तो भंडारा जिल्ह्यातील जंगलात राहणाऱ्या आदिवासीलासुद्धा त्याच क्षणी कळतो आणि उमजतो असे आपण मानतो. नैसर्गिक न्यायाचे एक तत्त्व असेही आहे की, नागरिकाला त्या कायद्याची माहिती करून दिल्याखेरीज किंवा ती माहिती होऊ शकेल अशी योजना असल्याखेरीज त्याला त्या कायद्याबद्दल जबाबदार धरणे सयुक्तिक होणार नाही. म्हणून कायदा हा लोकभाषेत असावा हे क्रमप्राप्तच आहे.

या संदर्भात आणखी एका गोष्टीचा विचार करणे भाग आहे. योजना—मग ती कुठल्याही स्वरूपाची असो—ती नेहमीच भावी पिढीसाठी असते. नातवांना आंबे खायला मिळावेंत म्हणून आजोबांना आंब्याची झाडे लावावी लागतात. जे आजोबा झाडे लावतात त्यांना फळे खायला कधीच मिळत नसतात. म्हणून आपल्याला ज्या झाडांची फळे चाखायला मिळणार नाहीत ती झाडेच कशाला लावावयाची ? अशी भूमिका स्वीकारता येणार नाही. ''प्रस्थापित'' किंवा ज्यांचे हितसंबंध गुंतलेले असतात ते नेहमीच कुठल्याही बदलाच्या विरुद्ध असतात. कारण कुठलाही बदल हा त्यांच्याकरता अडचणीचा असतो. म्हणून परिस्थितीत बदल नकोच आणि पुढच्याही पिढ्यांनी आपली 'कार्बन कॉपी' किंवा 'पाकेट एडिशन' होऊनच जगावे असे मानणे हे केवळ अमानवीयच नाही तर सुसंस्कृतपणाचेही लक्षण नव्हे. म्हणून राजभाषेचा विचार करीत असताना, पुढील पिढ्यांचा विचार करावयास हवा व आज अस्तित्वात असलेल्या परंतु, लवकरच काळाच्या उदरात विलीन होऊ पहाणाऱ्या पिढीचा विचार सोडून द्यावयास हवा. तेव्हाच या प्रश्नाची उकल करता येईल.

## समान संधीसाठी लोकभाषा

न्यायालयात ज्या प्रकारचे काम चालते आणि ज्या प्रकारची न्यायालये आज अस्तित्वात आहेत त्यांचे अनेक विभाग आहेत. काही कायद्यांनुसार न्यायाधिकरणांसमोर पक्षकारांतर्फे वकिलांना उपस्थित राहण्यास मज्जाव करण्यात आला आहे. तेव्हा वादी किंवा प्रतिवादींनी आपले काम स्वत:च चालवावे अशी या कायद्याची अपेक्षा आहे. महाराष्ट्रातील किमान जमिनीबद्दलचा कायदा किंवा औद्योगिक कलहाबद्दलचा कायदा या क्षेत्रांत मजूर आणि मालक, कूळ आणि जमीन मालक यांच्यातील न्यायालयीन संघर्ष असतो. एका दृष्टीने हे दोन पक्ष समान भूमिकेवर नसतात. मालक किंवा जमीन मालक हा केवळ श्रीमंतच नव्हे तर, तो सुशिक्षितसुद्धा असतो. आपल्या देशात संपत्ती हे केवळ विनियोगाचे साधन नाही तर त्या-योगे माणसेसुद्धा विकत घेण्याचे प्रयोग करण्यात येतात. तेव्हा श्रीमंत व सुशिक्षित माणसांच्या विरुद्ध गरीब माणसांनी आपले कज्जे चालवावेत अशी अपेक्षा असेल तर न्यायालयाची भाषा त्याला कळू शकेल व त्याच्या आवाक्यातील असेल अशीच असावी लागेल. एरव्ही समान संधीच्या-शिवाय असणारी समता ही विषमतेपेक्षाही घातक ठरू शकेल. म्हणून महसूल न्यायालये, औद्योगिक न्यायालय, ज्यांचा सामान्य नागरिकांशी प्रत्यक्ष संबंध यतो त्यांची भाषा लोकभाषाच असणे स्वाभाविक आणि हितावह आहे.

तद्वतच ज्या न्यायालयासमोर पक्षकाराला स्वत:च काम चालवावे लागेल त्या न्यायालयाची भाषा आणि निकालपत्रसुद्धा मराठीत असणे आवश्यक आहे. कनिष्ठ महसूल अधिकाऱ्याच्या निर्णयाविरुद्ध वरील अधिकाऱ्यांकडे किंवा महसूल न्यायाधिकरणापुढे त्याला आपले अपील अथवा रिव्हिजनचा अर्जसुद्धा स्वत:च चालवावा लागतो. म्हणून खालच्या कोर्टाचा निकाल त्याला कळला पाहिजे. त्यामुळे याबाबत निकालाची भाषासुद्धा मराठी असणे श्रेयस्कर ठरेल.

तालुका आणि जिल्हा पातळीवर आजकाल महाविद्यालये प्रस्थापित झालेली आहेत. या महाविद्यालयांतून अनेकदा संस्कृत आणि इंग्रजीसारखे

विषयसुद्धा मराठीतून शिकविले जातात व समजावूनही सांगितले जातात, असे ऐकिवात आहे. ग्रामीण भागात शिक्षणाचे माध्यमसुद्धा मराठीच झालेले आहे व या क्षेत्रात मातृभाषेवर अधिक भर देण्यात येत आहे. आजकाल जिल्हा पातळीवर विधि महाविद्यालयेसुद्धा उघडली गेली आहेत. या ग्रामीण क्षेत्रातील विद्यार्थ्यांना इंग्रजी फारसे चांगले येत नाही; परंतु ते बुद्धीने व कर्तृत्वात इतरांपेक्षा कमी असतात असे मानणे चुकीचे आहे.

असे असूनही केवळ सफाईदार इंग्रजी येत नाही म्हणून त्यांची पिछेहाट होते. त्यामुळे न्यूनगंडाने पछाडल्यागत त्यांची स्थिती झाली आहे आणि हीच दुसऱ्या पक्षाची जमेची बाजू आहे. शेवटी ग्रामीण जनता आणि पक्षकार यांच्याशी त्यांचीच जवळीक असते तेव्हा, त्यांनासुद्धा न्यायालयीन प्रक्रियेत वकील व न्यायाधीश म्हणून स्थान मिळू शकले पाहिजे. ही क्षेत्रे आर्थिक व सामाजिकदृष्ट्या पुढारलेल्या, श्रीमंत अगर उच्चवर्णीयांची मक्तेदारी ठरू नये असे वाटत असल्यास, कमीत कमी जिल्हा पातळीपर्यंत तरी इंग्रजीचा बाऊ कमी करून या मंडळींना समान संधी मिळू शकेल अशी योजना आखावी लागेल.

## गुणवत्ता कमी होणार नाही

इंग्रजांच्या राज्यातसुद्धा मराठीतून दावा व दाव्याचे उत्तर देण्याची प्रथा होती. काही न्यायाधीश मराठीतून सर्व कामकाज चालवीत असत. हैद्राबाद, बडोदे आणि इतर संस्थानांतून तेथील राज्याच्या भाषेतून न्यायालयाचा कारभार चालत असे. तेव्हा मराठीतून न्यायालयाचे काम चालले तर न्यायालयाची गुणवत्ता कमी होईल हे मानणे चुकीचे होईल. शेवटी शिक्षणाचे तोंड एकीकडे, शासकीय राज्यकारभाराचे दुसरीकडे व न्यायालयाचे तिसरीकडे असा विसंवादी सूर फार काळ चालू शकणार नाही.

या बाबतीत आणखी एका गोष्टीचा विचार करावा लागेल. गुणवत्तेची काळजी ही प्रस्थापित व पुढारलेल्या वर्गांना नेहमीच वाटत असते. शिक्षणाचा जेव्हा विस्तार झाला आणि तालुका पातळीवर जेव्हा महाविद्यालये उघडली गेली तेव्हाही शिक्षणाच्या गुणवत्तेबाबत शहर-

वासियांनी व वरिष्ठ वर्गांनी अशीच ओरड केली होती. दहा माणसां-साठी जो स्वयंपाक होतो, त्याचा दर्जा शंभर लोकांसाठी जो स्वयंपाक होतो, त्यापेक्षा उत्कृष्ट व दर्जेदार असतो. म्हणून दर्जा टिकावा यासाठी नव्वद माणसांना उपाशी ठेऊन फक्त दहा माणसांनीच यथेच्छ भोजन करावयाचे की काय, याचाही विचार कधीतरी करावाच लागणार आहे. ज्या देशात मागासलेले व अशिक्षित लोक बहुसंख्य आहेत, त्या देशात बहुसंख्य लोकांना सर्व सुखांपासून वंचित ठेवून काही मूठभर लोकांचाच विचार करावयाचा काय हेही ठरवावे लागेल. या बाबतीत एक आणखी गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. आपल्या संविधानातही आर्थिक व सामाजिक दृष्टचा मागासलेल्या वर्गासाठी सवलतींची खास योजना करण्यात आलेली आहे. समाजातील उच्चभ्रू व सुशिक्षित लोकांचा असा समज आहे की या सवलती संविधानाला अभिप्रेत असलेल्या समानतेच्या तत्त्वाच्या विरोधी आहेत. हा एक गैरसमज आहे.

**असमानांना समान वागणूक म्हणजे समता नव्हे**

समसमान लोकांना समान वागणूक देणे हा समतेचा अर्थ आहे. असमान लोकांना समानतेने वागविणे म्हणजे समानता नव्हे, ती असमानता ठरेल. उच्चभ्रू व प्रतिष्ठित लोकांच्या मुलांनी वयाच्या तिसऱ्या वर्षापासून किंडरगार्टन व कान्व्हेंटमध्ये शिकायचे व खेडचातील गरीब लोकांच्या मुलांनी सातव्या वर्षापर्यंत खेडचातील गल्लीबोळात फिरावयाचे व नंतर ग्रामपंचायती, नगरपालिका व सरकार ज्या संस्थांमधून मोफत शिक्षण देते, त्या संस्थांमधून शिक्षण घ्यायचे. एका वर्गाचे शिक्षण इंग्रजी माध्यम असलेल्या पब्लिक स्कूलमधून व्हावयाचे तर दुसऱ्याचे शिक्षण तालुका पातळीवरील महाविद्यालयातून व्हावयाचे व अशी तळापासून विषमता असतानासुद्धा वरच्या वर्गांनी समान वागणुकीची ओरड करा-वयाची म्हणजे समानता नव्हे. या दोन वर्गांतील मुलांच्या जीवनाची सुरुवात एकाच बिंदूपासून होत नसल्यामुळे (Equalisation of the Starting Point) त्यांच्यासाठी ही सवलतीची योजना केलेली आहे.

हरीजन, गिरीजन, आदिवासी या वर्गातील होतकरू, हुशार व सत्चरित्र तरुणांना न्यायप्रक्रियेत भाग घेण्याची संधी उपलब्ध करून देणे हे स्वातंत्र्य मिळाल्यानंतर तीस वर्षांनी तरी आवश्यक आहेच. याही मंडळींना प्रतिष्ठेने न्यायसंस्थेत भाग घेता यावा अशी इच्छा असेल तर इंग्रजीचे स्तोम कमी करून खालच्या थरावर तरी मराठीची सुरुवात करावीच लागेल. एरव्ही सर्व समानतेची बोलणी समानसंधीखरीज कुचकामी व फोल ठरतील. शेवटी लोकशाही समाजरचनेत न्यायदानपद्धतीसुद्धा लोकाभिमुखच असावी लागेल. खालच्या वर्गाने नेहमीच वरिष्ठ वर्गाच्या दयेवर व दानावर जगावे व आपल्या न्यायोचित हक्कांपासून वंचित रहावे हे दोन्ही वर्गांना शोभण्यासारखे नाही. त्यांनाही कुणाच्याही मेहरबानी-वर न जगता आपल्या न्याय्य हक्कांचा उपभोग घेता आला पाहिजे.

### एकजिनसीपणा हवा

खऱ्या अर्थाने आपण १५ ऑगस्ट १९४७ रोजीच जर मुहूर्त साधून राष्ट्रभाषेचा प्रश्न सोडवून टाकला असता तर आज उपस्थित झालेल्या अनेक समस्या केव्हाच सोडविल्या गेल्या असत्या. सर्वोच्च न्यायालयाच्या कारभाराची भाषा, राष्ट्रभाषा हिंदी किंवा हिंदुस्थानी होऊ शकली असती, तर तीच भाषा उच्च न्यायालयाची झाली असती. आजसुद्धा उच्च न्यायालयात इंग्रजीबरोबरच ऐच्छिक किंवा वैकल्पिक भाषा म्हणून हिंदीचा वापर मध्यप्रदेश व राजस्थान या राज्यांनी स्वीकारलेला आहे. आजच्या परिस्थितीत न्यायदान आणि न्यायसंस्था यांच्यातील सर्वोच्च न्यायालयापासून खालपर्यंत एकजिनसीपणा व एकात्मता कायम रहावी म्हणून सर्वोच्च न्यायालय व उच्च न्यायालय यांच्या कारभाराची व निकालाची भाषा इंग्रजी असणे आवश्यक आहे. या बाबतीत एक असाही विचार मांडला जातो की या देशात राहणाऱ्या कुठल्याही राज्यातील वकिलाला कुठल्याही राज्याच्या उच्च न्यायालयात जाऊन युक्तिवाद करता आला पाहिजे. वकीलवर्गाची अखिल भारतीय अस्मिता आणि संस्था यांच्या दृष्टीने हे आवश्यकच ठरते. म्हणून इंग्रजी ही तूर्त तरी

सर्वांना जोडणारी भाषा असल्यामुळे तिचा वापर कायम रहावा असे सद्य:परिस्थितीत तरी मानण्यावाचून गत्यंतर नाही. एका उच्च न्यायालयाचे दाखले, इतर राज्यांतील उच्च न्यायालयांतच नव्हे तर इतर न्यायालयांमध्येही उद्धृत केले जातात म्हणून सर्व उच्च न्यायालयांची भाषा एकच असणे हे आवश्यक आहे. परंतु हा नियम जिल्हास्तरावरील न्यायालये, विशिष्ट कायद्याखाली स्थापन झालेली न्यायाधिकरणे—उदा. सहकार न्यायाधिकरण, औद्योगिक न्यायालये, महसूल न्यायाधिकरण यांच्याबाबत गैरलागू आहेत. जिल्हास्तरापर्यंतच्या न्यायालयांमधून साक्षीपुरावेसुद्धा मराठीत नोंदवून घेतले जातात. न्यायाधीश इंग्रजीतून टिपणे घेतो; परंतु इंग्रजी टिपणे व मराठी साक्षीपुरावा यांत तफावत असली तर मूळ मराठी पुरावा अधिकृत मानला जातो. हे सारे निकाल बहुधा साक्षीपुराव्यावरच अवलंबून असतात. असे असताना त्या साक्षीपुराव्यावरहुकूम मराठीतून युक्तिवाद करणे अधिक सोयीचे ठरू शकते. याच तत्त्वानुसार त्याच साक्षीपुराव्यावर आधारित असलेला निकालसुद्धा मराठीतून असण्यास प्रत्यवाय किंवा हरकत असू नये.

### नाण्याची दुसरी बाजू

या नाण्याची दुसरी बाजू आपण समजून घेतली पाहिजे. इतर राज्यांतील हुशार वकिलांना जर कुठल्याही उच्च न्यायालयात जाऊन युक्तिवाद करता आला पाहिजे असे आपण मानतो आणि जर हे न्यायसंस्थेच्या गुणवत्तेसाठी आवश्यक आहे, तर मग त्याच राज्यातील हुशार, होतकरू व अनुभवी वकिलाला केवळ इंग्रजीवर प्रभुत्व नाही म्हणून त्याच राज्यातील उच्च न्यायालयात युक्तिवाद करण्यापासून आपण वंचित करू इच्छितो काय ? युक्तिवाद हा शेवटी आपली बाजू प्रभावीपणे मांडण्यासाठी व चांगल्या तऱ्हेने समजावून सांगण्यासाठी असतो. म्हणून ज्या भाषेत बाजू समर्थपणे समजावून सांगता येईल, मांडता येईल, त्या भाषेचा युक्तिवादाचे साधन म्हणून उपयोग करण्यास हरकत असू नय. शेवटी युक्तिवाद हे साधन आहे, साध्य नव्हे. उच्च न्यायालयाचे निकाल इंग्रजीतच

दिले जातात. त्यामुळे केवळ युक्तिवाद मराठीतून केला तरी अखिल भारतीय न्यायसंस्थेच्या एकजिनसीपणाला बाधा येणार नाही. त्यात फक्त एकच बंधन पाळावे लागेल, ते म्हणजे विरुद्ध बाजूच्या वकिलाला व न्यायाधीशाला मराठी भाषा अवगत असली पाहिजे, समजली पाहिजे.

आज उच्च न्यायालयातदेखील मृत्युपत्र, विक्रीखत, आदि दस्तऐवज मूळ मराठीत असल्यास ग्राह्य मानून वाचण्याचा प्रघात आहे. त्याखेरीज दस्तऐवजातील कलमांचे बारकावे लक्षात येत नाहीत. भाषांतर हे शेवटी भाषांतर असते आणि सर्वच मूळ शब्दांना इंग्रजीत चपखल प्रतिशब्द मिळणे शक्य नसते. सामान्य जनांची जर स्वस्त, सुलभ व त्वरित न्याय मिळावा म्हणून अशी अपेक्षा असेल की महाराष्ट्रात तरी मराठी दस्तऐवजांच्या भाषांतराची गरज पडू नये तर, ती अपेक्षा फार चुकीची, गैरवाजवी आहे असे म्हणता येणार नाही. या बाबतीत हेही नमूद करण्यासारखे आहे की, आजसुद्धा जेव्हा एखादा पक्षकार उच्च न्यायालयात स्वत:ची बाजू स्वत: मांडू इच्छितो तेव्हा त्याला जर इंग्रजी येत नसेल तर त्याचा युक्तिवाद मराठीतून ऐकून घेणारे न्यायमूर्ती उच्च न्यायालयात आहेत. त्यामुळे निकालाच्या गुणवत्तेवर परिणाम होतो, असाही आजवरचा अनुभव नाही. शेवटी हे सारे प्रश्न आपण कुठल्या दृष्टिकोनातून या प्रश्नांकडे पाहतो त्यावरच अवलंबून असतात. केंद्रीय कायदा संसदेने केलेला असतो आणि त्याचे स्वरूप अखिल भारतीय असते. राज्यपातळीवरील कायद्याच्या बाबतीतही असा अनुभव आहे की, सर्वच प्रांतांत तशाच प्रकारचे कायदे असतात. त्यामुळे कायद्यांच्या निर्णयाच्या बाबतीत सुसूत्रता असावी म्हणून सर्वच प्रांतांतील उच्च न्यायालयांची भाषा एक असणे आवश्यक आहे. त्या भाषेचे स्थान राष्ट्रभाषा म्हणून हिंदीने घेईपर्यंत इंग्रजी सुरू ठेवणे आवश्यक दिसते. ही शेवटी संक्रमणावस्था आहे. स्वातंत्र्यानंतर ३०-३२ वर्षे होऊन गेली असली तरी संक्रमणावस्था संपतच नाही हे खरोखरी दुर्दैव आहे. परंतु त्याला इलाज नाही. भाषा कुणावरही लादता येत नाही आणि लादण्याचा प्रयत्न केला की विरोध फोफावतो. प्रांतीय सामंजस्य आणि एकजिनसीपणा हे भारतीय नागरि-

कत्वाच्या दृष्टीनेसुद्धा आवश्यक आहे. त्यामुळे त्या बाबतीत दुराग्रह उचित नाही. याशिवाय उच्च न्यायालयाच्या निकालाविरुद्ध सर्वोच्च न्यायालयात जावे लागते. सर्वोच्च न्यायालयाची भाषा कुठलीही प्रांतीय भाषा असणे संभवत नाही. ती भाषा अखिल भारतीय स्वरूपाचीच असावी लागेल. तेव्हा सर्वोच्च न्यायालय आणि उच्च न्यायालये यांच्या कारभारात सुसंगती असावी आणि एकजिनसीपणा असावा म्हणून उच्च न्यायालयाच्या निकालांच्या बाबतीत तूर्त तरी राजभाषेचा आग्रह धरणे अनुचित ठरेल.

**न्यायदानाची लोकाभिमुख भूमिका**

वर म्हटल्याप्रमाणे माणसाला मातृभाषासुद्धा शिकावीच लागते. त्यामुळे इतर भाषिक लोकांनासुद्धा मराठी शिकता येणारच नाही हेही मानणे चुकीचे आहे. एरव्ही आपण इंग्रजी शिकतोच. केरळ, तामिळनाडू किंवा बंगाल या प्रदेशांतून येणारे परंतु महाराष्ट्रात नेमणुका झालेले आय. ए. एस. चे अधिकारी मराठी शिकून त्या भाषेत बोलू आणि लिहू शकतात असा अनुभव आहे. म्हणून महाराष्ट्रातसुद्धा मराठी भाषेतील कागदपत्रांचे इंग्रजीत भाषांतर केल्याशिवाय उच्च न्यायालयातसुद्धा कामकाज चालू शकेल अशी परिस्थिती जर निर्माण होऊ शकली तर सुलभ आणि त्वरित न्यायाच्या दृष्टिकोनातून बरीच मदत होण्यासारखी आहे. सामान्य नागरिकाला समजेल अशी भाषा जिल्हा पातळीवरच्या न्यायालयापर्यंत सर्व कामकाजाच्या बाबतीत असण्यास हरकत दिसत नाही त्यामुळे पक्षकाराची पिळवणूक संपेलच असे हमखास म्हणता येणार नाही. परंतु तिची तीव्रता कमी होऊ शकेल. शिवाय मध्यस्थाशिवाय निकाल आणि कायदा समजावून घेण्याचा जर कोणी प्रयत्न करण्याचे ठरविले तर तशी सोय उपलब्ध होऊ शकेल. प्रत्येक क्षेत्रातून — मग ते आर्थिक, सामाजिक अगर धार्मिक असो — मध्यस्थांचे उच्चाटन करणे हे लोककल्याणकारी राज्याचे कर्तव्य आहे. कमीत कमी 'व्हिलेज बॅरिस्टर' व कज्जेदलालीचा धंदा करून जगणाऱ्यांपासून तरी मुक्ती मिळेल. या बाबतीत न्यायसंस्थेच्या प्रतिष्ठेच्या दृष्टीने आणखी एका गोष्टीचा विचार

करणे आवश्यक आहे. न्यायालयांत तुंबलेल्या प्रकरणांची संख्या अमाप आहे व ती सारखी वाढतच आहे. अशा वेळी न्यायदानाच्या प्रक्रियचा एक भाग म्हणून शक्य तो आपसात तडजोड घडवून आणून भांडणे आपसात मिटवावीत असा नवा विचार पुढे येतो आहे. या संदर्भात महाराष्ट्र राज्याने तयार केलेल्या महाराष्ट्र राज्य कायदेविषयक सहाय्य व सल्ला योजना, १९७९ या योजनेचा उल्लेख करता येईल. संविधानाच्या कलम ३९-अ, मध्ये अंतर्भूत असलेल्या निर्देशित तत्त्वानुसार आर्थिक व सामाजिकदृष्टचा मागासलेल्या वर्गाला समान संधी मिळावी म्हणून ही योजना आखण्यात आलेली आहे. या योजनेनुसार तालुका पातळीपासून मुंबई महानगरपालिका स्तरापर्यंत वेगवेगळ्या समित्या स्थापण्यात येत आहेत. या समित्यांची एक शाखा म्हणून एक समेट शाखा (Conciliation cell) असावी अशी योजना आहे. या समित्यांवर समितीच्या सदस्यांव्यतिरिक्त समाजातील सन्माननीय नागरिकांचा समावेश असावा असे ठरविण्यात आले आहे. स्त्रिया व अनुसूचित जाती, जमाती, विमुक्त व भटक्या जाती यासाठी स्वतंत्र समेट शाखा निर्माण करावयाच्या आहेत. अर्थात या समित्यांचे सदस्य कायदेतज्ज्ञाव्यतिरिक्त सामान्य नागरिकांतून निवडलेले असतील. त्यामुळे न्यायालयात येणारा खटला, त्याचे स्वरूप, संबंधित कायदा याची जाणीव याही सदस्यांना असणे आवश्यक ठरेल. एखाद्या न्यायालयासमोर किंवा प्राधिकरणासमोर दाखल झालेल्या खटल्यातसुद्धा न्यायाधीशास योग्य वाटल्यास तो विवाद दोन्ही पक्षांत समेट घडवून आणण्यासाठी संबंधित समेट शाखेकडे पाठविता येईल अशीही तरतूद या योजनेमध्ये करण्यात आलेली आहे. त्यामुळे ही कायदेविषयक सल्ला व सहाय्य योजना व संविधानाला अभिप्रेत असलेली मार्गदर्शक तत्त्वे जर साध्य करावयाची असतील तर न्यायदानाची भूमिका ही लोकाभिमुख असावी लागेल व लोकांनाही या प्रक्रियेत भाग घेता येईल अशी व्यवस्था करावी लागेल.

हे ध्येय प्रत्यक्षात अंमलात आणण्यासाठी जिल्हा पातळीवरील न्यायालयाची व कायद्याची भाषा सर्वसामान्यांना समजावी म्हणून 'मराठीचं'

असावी लागेल. एरवी संविधानाला अभिप्रेत असलेली व नागरिकांचा सहभाग असणारी कायदेविषयक सहाय्य व सल्ल्याची योजना कार्यान्वित करणे कठीण जाईल. न्यायसंस्थेच्या काही अंगभूत अशा मर्यादा आहेत. खरे-खोटे दोन्ही बाजूंच्या पक्षकारांनाच माहीत असते. त्यामुळे आपसात तडजोड घडवून आणून दोन्ही बाजूंचे समाधान होईल असाच प्रयत्न करावा लागेल. त्यामुळे शक्यतो तडजोड घडवून आणणे हीच खरी न्यायाची प्रक्रिया असू शकेल. यासाठी न्यायदानाच्या प्रक्रियेत सामान्य नागरिकांचा सहयोग मिळावा म्हणून शक्य तेथे लोकभाषांचाच वापर अधिकाधिक करावा लागेल.

**सामान्यांच्या जीवन-मरणाचा प्रश्न**

काही लोकांच्या मते कायद्याची पुस्तके मराठीत उपलब्ध असल्या-शिवाय या गोष्टींची सुरुवात करता येणार नाही; तर काही व्यक्तींना वाटते की, असा तुटक तुटक विचार करणे उचित ठरणार नाही. प्रथम पुस्तके निर्माण करावयाची, नंतर त्या पुस्तकांच्या मदतीने कायद्याचे शिक्षण द्यायचे, त्यानंतर न्यायालयाची भाषा बदलायची असा जर क्रम-वारीने विचार केला तर यत्या अनेक वर्षांत हे घडेल असे वाटत नाही. पोहता आल्याशिवाय पाण्यात उतरायचे नाही असे जर ठरविले तर पोहणे कधीच शिकता येत नाही. म्हणून सर्वच आघाड्यांवर एकदमच सुरुवात करता येणे शक्य आहे. कमीत कमी शक्य असेल त्या त्या क्षेत्रात ताबडतोब सुरुवात करणे आवश्यक आहे. यातूनच प्रगतीचा मार्ग सुकर होईल. एरव्ही कुठूनच सुरुवात होणार नाही. आणि आज चालले आहे तशीच परिस्थिती कायम राहील अशी भीती वाटते. राजभाषेत पारि-भाषिक शब्द नाहीत म्हणून पारिभाषिक शब्द निर्माण होईपर्यंत थांबावे असाही एक विचार मांडण्यात येतो. भाषेचा वापर सुरू झाल्याखेरीज पारिभाषिक शब्दांची निर्मिती होत नाही आणि वापर सुरू करण्याची मनात जर इच्छा असेल तर पारिभाषिक शब्दांवाचून कधीच अडत नाही असा आजवरचा अनुभव आहे. विचारांची अभिव्यक्ती आवश्यक ठरली

की शब्द आपोआप सुचत जातात व ते शब्द पारिभाषिक नसले तरी अर्थवाही असतात. हा प्रश्न सामान्य माणसाच्या मुक्तीचा प्रश्न आहे. हा एका अर्थाने त्याच्या जीवन-मरणाचाही प्रश्न आहे. भारतीय लोकशाही प्राणवान व्हावी असे वाटत असेल तर सामान्य माणसाचा सर्व क्षेत्रातील सहयोग वाढविण्याच्या दृष्टीने सर्व क्षेत्रांत लोकभाषेचा प्रयोग करावयाचा की नाही याचा कधीतरी निर्णय घ्यावा लागेल. हा मुहूर्त जितक्या लवकर साधता येईल तितक्या लवकर साधला तर पुढच्या अडचणी संपू शकतील. आणि म्हणून कुठल्याही तज्ज्ञांच्या आणि विशेषज्ञांच्या दृष्टिकोनातून या गोष्टीचा विचार न करता सामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून सर्वंकष विचार करावा लागेल.

शेवटी सामान्य माणसाच्या कर्तृत्वानेच हे प्रश्न सुटणार आहेत, कारण तोच लोकशाहीचा विधाता आहे. एकूण समाजरचना बदलण्याचा इतरांनी जो विडा उचलला आहे त्यात न्यायसंस्था सहभागी होऊ इच्छिते की नाही एवढाच प्रश्न उरतो. आपली गुणवत्ता, अखिल भारतीय स्वरूप व एकजिनसीपणा कायम ठेवून न्यायसंस्थेला या बाबतीत जेवढे सहकार्य करता येईल तेवढे करावे एवढीच सामान्य माणसाची आकांक्षा आहे. कारण शेवटी त्यालाही कायद्याचेच राज्य हवे आहे.

# मराठी भाषेतून विज्ञान

**वि**ज्ञानाचे शिक्षण मराठीतून होणे उचित आहे का ? विज्ञानप्रसाराचे काम मराठीतून करता येईल का ? उच्च शिक्षणासाठी, संशोधना-साठी वैज्ञानिकांनी मराठीचा वापर करावा का ? इंग्रजी पारिभाषिक शब्दांचे मराठीकरण करावे का ? अशा प्रकारच्या अनेक प्रश्नांवर वेळोवेळी चर्चा होत असते. त्यापैकी काही प्रश्नांवर मी आपले विचार मांडू इच्छितो.

असल्या विवाद्य प्रश्नांवर चर्चा करताना दोन गोष्टी लक्षात घेणे आवश्यक असते. एक म्हणजे मत मांडणाऱ्याची पार्श्वभूमी, त्याचा अनुभव आणि त्याच्या त्या क्षेत्रातील अधिकाराच्या मर्यादा लक्षात घेतल्या पाहिजेत. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे वरील प्रश्नांची उत्तरे शोधताना संदर्भ ध्यानात घेतला पाहिजे. ह्या प्रश्नांची उत्तरे केवळ 'होय' किंवा 'नाही' ह्या स्वरूपाची नसून संदर्भावर अवलंबून आहेत. तेव्हा माझे विचार व्यक्त करण्यापूर्वी मी प्रथम माझ्या स्वतःच्या मर्यादा स्पष्ट करतो आणि मग मी कोणत्या संदर्भात ह्या प्रश्नांची चर्चा करणार आहे ते सांगतो.

माझ्या आयुष्यातील पहिली १९ वर्षे बनारसमध्ये आणि त्यानंतरची १५ वर्षे केंब्रिजमध्ये गेली. माझे शालेय शिक्षण, मॅट्रिकपर्यंत, हिंदी

माध्यमातून झाले; तर बी. एससी. पर्यंतचे कॉलेज शिक्षण इंग्रजी माध्यमातून झाले. परदेशात तर सर्व व्यवहार इंग्रजीतूनच चाले. मराठी वातावरणाशी (आणि तेही मुंबईतील कुलाबा विभागातील! ) संपर्क १९७२ मध्ये मुंबईत स्थायिक झाल्यावरच आला. तेव्हा अशा तोकडचा अनुभवावर ह्या गृहस्थाला मराठी भाषेबद्दल बोलण्याचा काय अधिकार आहे असे कोणाला वाटल्यास ते साहजिकच आहे. जमेच्या बाजूने मी फक्त एवढेच सांगू इच्छितो.

लहानपणापासून घरामध्ये मी नेहमी मराठीतच बोलत आलो आहे. ते अस्सल पुणेरी सदाशिव पेठी मराठी नसले तरी मराठीच आहे. इंग्लंड–अमेरिकेत वर्ष दोन वर्षे राहून 'Sorry, I have forgotten Marathi.' असे अभिमानाने सांगणाऱ्या माझ्या काही देशबांधवांचे कसब मला साधले नाही. किंवा मुंबईतच राहून आपल्या मुलांना इंग्रजी शाळेत पाठवून त्यांच्याशी घरी इंग्रजीत बोलून त्यांना आपली मातृभाषा विसरायला लावणाऱ्या आईबापांशीही मी सहमत नाही.

ही आत्मपरीक्षा केल्यावर मी आता 'मराठी भाषेतून विज्ञान' ह्या विषयाचा ज्या संदर्भातून विचार करणार आहे ते तीन संदर्भ असे आहेत :

एक : जनसामान्यात विज्ञानाचा प्रसार,
दोन : शालेय पाठ्यक्रमांतील वैज्ञानिक शिक्षण,
तीन : वैज्ञानिक उच्च शिक्षण आणि संशोधन.

ह्या तीन वेगवेगळ्या संदर्भात मराठीचा उपयोग किती केला जावा याची मी आता चर्चा करणार आहे. मी जे विचार मांडणार आहे ते संपूर्ण वैयक्तिक स्वरुपाचे आहेत आणि ते मी आताच नमूद केलेल्या माझ्या तोकडचा अनुभवांवर आधारलेले आहेत.

आपला समाज——मग तो शिक्षित असो किंवा अशिक्षित असो—— वैज्ञानिक दृष्टीने अतिशय मागासलेला आहे. अशिक्षितांबाबत मी समजू शकतो——पण आपल्या सुशिक्षितांमध्ये विज्ञानाबद्दल जी अनास्था, 'हे आपल्याला समजणारच नाही' अशी प्रवृत्ती आणि दैनंदिन जीवनात

विज्ञानप्रणीत वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अभाव हे पाहून सखेद आश्चर्य वाटते.

विज्ञानाबद्दलचे गैरसमज दूर करायचे आणि जनमनात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजवायचा म्हटले तर पुष्कळ साधने आज उपलब्ध आहेत. फिल्म, रेडिओ, टी. व्ही., नियतकालिके, वर्तमानपत्रे इत्यादी प्रसिद्धी-माध्यमांतून ह्याबाबत माहिती पुरवणे शक्य आहे. पाश्चात्य देशात ही सर्व साधने पुष्कळ वापरली जातात. लेख, कथा, नाटके इत्यादी साहित्याच्या प्रकारांतून विज्ञानप्रसार तेथे होत आहे. म्हणून हवी असल्यास इंग्रजीतून बरीच सामग्री मिळू शकेल.

## विज्ञानाचा प्रसार मातृभाषेतून हवा

परंतु ही सामग्री जशीच्या तशी आयात करून वापरावी ह्या मताच्या मी विरुद्ध आहे. हा विज्ञानप्रसार मातृभाषेतून झाला तरच प्रभावी ठरेल असे माझे मत आहे. विज्ञान म्हणजे काही तरी अनाकलनीय गोष्ट आहे ही भावना जनमनातून दूर करायला त्या जनमनात होणारे विचार ज्या भाषेत होतात ती भाषा वापरणे आवश्यक आहे. म्हणून महाराष्ट्रात ह्या दृष्टीने मराठीतून लोकाभिमुख विज्ञान-साहित्य निर्माण झाले पाहिजे. असे साहित्य तयार करायला आपल्याला परदेशातील अनुभवांचा निश्चितच फायदा होईल पण परदेशी साहित्य निव्वळ भाषांतर करून चालणार नाही. त्याला भारतीय—त्यातूनही स्थानिक—स्वरूप देणे आवश्यक आहे.

शाळेतून विज्ञान कुठल्या भाषेतून शिकवावे ह्या माझ्या दुसऱ्या प्रश्नाकडे आता मी वळतो. लहान वयात मातृभाषेतूनच विज्ञान शिकवणे सोपे जाईल असे मला वाटते. विज्ञान हा विचार करायला लावणारा विषय आहे—इतिहास-भूगोलाप्रमाणे पाठांतरप्रधान विषय नव्हे. विद्यार्थ्याचे कुतूहल जागृत करून त्याला विचार करायला लावले तरच त्याला विज्ञान आत्मसात करता येईल. आणि म्हणून विद्यार्थी ज्या भाषेत विचार करतो ती भाषा विज्ञानशिक्षणाला उपयुक्त ठरेल असा माझा तर्क आहे. त्या

तर्कानुसार महाराष्ट्रात बहुसंख्य प्राथमिक शाळांतून मराठीतूनच वैज्ञानिक शिक्षण दिलेले उचित होईल असे मला वाटते. त्याकरिता शक्यतो मराठी पारिभाषिक शब्द वापरावेत, अर्थात ते क्लिष्ट नाहीत याची काळजी घेऊनच.

## संशोधन मात्र इंग्रजीतून हवे

परंतु विज्ञानातील उच्च शिक्षण आणि संशोधन आपण इंग्रजीतूनच करावे असा माझा दावा आहे. या मागची कारणे मी पुढे सांगेन. पण जर हा दावा ग्राह्य मानला तर मराठीतून इंग्रजीकडे बदल करायचा तो केव्हा आणि कसा याबाबत माझ्या काही सूचना आहेत. एक सूचना अशी की, माध्यमिक शाळात व हायस्कूलमध्ये इंग्रजी हा विषय शिकवावा. विज्ञान मराठीतूनच शिकवावे पण इंग्रजी पारिभाषिक शब्द वापरून. म्हणजे विद्यार्थी कॉलेजमध्ये इंग्रजीतून विज्ञान शिकायला लागला की त्याचे इंग्रजी कच्चे असणार नाही आणि विज्ञान समजायला अवघड जाणार नाही.

माझ्या स्वत:च्या बाबतीत असेच घडले. बनारसमध्ये मला हिंदी मातृभाषेप्रमाणेच परिचित होती. विज्ञान हिंदीतून शिकवले गेले पण इंग्रजीचे शिक्षण तिसऱ्या इयत्तेपासून होते. त्यामुळे कॉलेजमध्ये इंग्रजी माध्यमातून विज्ञान शिकायला मला काहीही त्रास झाला नाही.

मी लहान असताना—म्हणजे ब्रिटिश अमदानीत इंग्रजी आणि संस्कृत यांच्या शिक्षणाबद्दल महाराष्ट्राची पुष्कळ ख्याती होती. आम्हा 'यूपीवाल्या'पेक्षा महाराष्ट्रातील मुले इंग्रजी आणि संस्कृतमध्ये खूप पुढे आहेत असे आम्हाला सांगण्यात येई. आता ती कीर्ती महाराष्ट्राने पार गमावली आहे. त्याकरिता दोषारोप कोणावर करायचा ते मला माहीत नाही पण वस्तुस्थितीबद्दल खेद व्यक्त करायचे स्वातंत्र्य मात्र घेतो.

मराठी पारिभाषिक शब्दांसंबंधी दोन मुद्दे थोडक्यात सांगून मी वैज्ञानिक संशोधनाकडे आणि उच्च शिक्षणाकडे वळतो. मुद्दा नंबर एक : जर शालेय शिक्षणात विद्यार्थ्याला संस्कृत भाषेचा कुठेही स्पर्श होणार

नसेल तर ती भाषा आणि तीवर आधारलेली पारिभाषिक शब्दावली त्याला परकीच वाटणार. मुद्दा नंबर दोन : संस्कृतवर आधारलेली पारिभाषिक शब्दावली निदान संस्कृतपासून उगम पावलेल्या सर्व भारतीय भाषांत तरी समान असणे योग्य नाही का? वस्तुस्थिती मात्र वेगळी आहे. उदाहरणार्थ हिंदी आणि मराठीतच पहा. एकाच इंग्रजी शब्दासाठी संस्कृतवर आधारलेले वेगळे पारिभाषिक शब्द अनेकदा सापडतील.

## विज्ञानाच्या मराठीकरणाचा अट्टाहास मूर्खपणाचा

विज्ञानाची प्रगती इतकी झपाट्याने होत आहे की, उच्च शिक्षणाचा अभ्यासक्रम दर काही वर्षांनी बदलणे आवश्यक आहे. संशोधकाला तर आपल्या क्षेत्रात जगात इतरत्र काय काम चालले आहे यावर सारखी नजर ठेवावी लागते. ही माहिती इंग्रजी भाषेतून सर्वात जास्त सोयिस्कर रीतीने उपलब्ध होते. ज्याला ही भाषा अवगत नाही त्याची परिस्थिती कूपमंडुकाप्रमाणे होणार यात शंका नाही. कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांना-सुद्धा अभ्यासेतर विज्ञानात रस घ्यायचा असला तर तात्कालिक वैज्ञानिक घडामोडींची माहिती इंग्रजीतून अनेक नियतकालिकांतून वाचायला मिळते.

अशा परिस्थितीत—जिथे विज्ञान आत्मसात करायला वेळच थोडा आहे—जिथे आजचे संशोधन उद्या शिळे होते ही वस्तुस्थिती आहे—तिथे विज्ञानाच्या मराठीकरणाचा अट्टाहास मूर्खपणाचा नव्हे का? इंग्रजीकडे आपण अनेकदा राजकीय दृष्टीने पाहतो. गुलामगिरीत आपल्यावर दडपलेली भाषा स्वातंत्र्याच्या काळात का वापरायची अशी गर्जना अनेक राजकीय नेत्यांकडून ऐकायला मिळते. ठीक आहे. जेथे राष्ट्रीय बाबी आहेत तेथे तुम्ही ही दृष्टी वापरली तर गैर नाही. पण विज्ञान हे राष्ट्रीय नसून आंतरराष्ट्रीय आहे हे विसरून उपयोग नाही. आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर इंग्रजी ही विज्ञानाची भाषा होत चालली आहे.

एक उदाहरण देऊन हा मुद्दा पुरा करतो. गणकयंत्रांचा वैज्ञानिक संशोधनात उपयोग झपाट्याने वाढत आहे. गणकयंत्रावर सोडवायच्या

कार्यप्रणालीची देवाणघेवाण वेगवेगळ्या देशांतल्या शास्त्रज्ञांत होऊ लागली आहे. स्वानुभवाने तयार केलेली कार्यप्रणाली दुसऱ्याला उपयोगी ठरावी अशा हेतूने ही देवाणघेवाण होते. ही कार्यप्रणाली इंग्रजीत असते. जर आपण इंग्रजीचा त्याग केला तर ह्या क्षेत्रातील वाढत्या संशोधन-कार्यातला आपला वाटा नाहीसा होईल.

तेव्हा थोडक्यात सांगायचे म्हणजे जनसामान्यांपर्यंत विज्ञान पोचवायला आणि प्राथमिक शाळांतून विज्ञानाचे शिक्षण देण्यासाठी महाराष्ट्रात मराठीचा वापर उपयोगी ठरेल. आणि सध्याच्या परिस्थितीत अशा वापराला वाव पण पुष्कळ आहे. परंतु राजभाषेवरील प्रेमामुळे तिचा वापर वैज्ञानिक संशोधनासाठी आणि उच्च शिक्षणासाठी करणे कितपत व्यवहार्य आहे याचा गंभीरपणे विचार करावा लागेल. कारण या बाबी राज्यापुरत्या किंवा राष्ट्रापुरत्या मर्यादित नसून आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या आहेत.

•

# मराठीतून कायद्याचे शिक्षण

प्रादेशिक भाषांच्या माध्यमातून उच्च शिक्षणासकट सर्व थरांचे शिक्षण दिले जावे अशी शिफारस कोठारी आयोगाने केली. गेल्या तेरा वर्षांत अनेक विद्यापीठांतून प्रादेशिक भाषा हे माध्यम म्हणून स्वीकारण्यात आले आहे. काही ठिकाणी भारतीय भाषांतून परीक्षांचे पेपर लिहिण्याची मुभा आहे. तर काही ठिकाणी प्रादेशिक भाषेतून व्याख्यानेही देण्यात येत आहेत. इंग्रजी हे माध्यम मात्र सर्व विद्यापीठांत ठेवण्यात आले आहे. प्रादेशिक भाषांच्या माध्यमासाठी लागणाऱ्या ग्रंथांच्या निर्मितीसाठी प्रयत्न सुरू आहेत. अर्थात त्या दिशेने आजवर झालेली प्रगती फारच अल्प आहे. तांत्रिक विषयांमध्ये मात्र माध्यमाचा बदल होणे फार जिकिरीचे आहे असा अनुभव येत आहे. अनेक ठिकाणी प्रादेशिक भाषांच्या माध्यमाची सोय झाली असताना देखील शहरी आणि महत्त्वाकांक्षी विद्यार्थ्यांचा कल इंग्रजी माध्यमाकडेच दिसून येतो.

कायदे शिक्षणाचा प्रश्न जास्त गुंतागुंतीचा आहे. काही विद्यापीठांतून प्रादेशिक भाषेमध्ये उत्तरे लिहिण्याची मुभा देण्यात आली आहे हे खरे परंतु बहुसंख्य विद्यापीठांतून इंग्रजी एकमेव माध्यम म्हणून कायम आहे. राज्य सरकारांची कायदे शिक्षणाबाबतची उदासीन वृत्ती ह्यास बऱ्याच

अंशी कारणीभूत आहे. पण इतरही अनेक व्यवहार्य अडचणी आहेत. एक गोष्ट स्पष्ट करणे जरूर आहे. इंग्रजीचे माध्यम म्हणून संपूर्ण उच्चाटन होणे शक्य नाही आणि हितकारकही नाही. हे केवळ कायदे शिक्षणाबाबतच नाही तर सर्व उच्च शिक्षणाबाबत म्हणता येईल.

भारत हा देश बहुभाषिक आहे आणि आज औद्योगीकरणामुळे म्हणा किंवा इतर अनेक कारणांमुळे म्हणा, प्रत्येक शहर हे बहुभाषी झाले आहे. नोकरीधंद्यामुळे परप्रांतीयांचे दळणवळण वाढले आहे. भारताच्या संविधानानुसार, कुठल्याही नागरिकास भारताच्या कुठल्याही जागी स्थायिक होता येते आणि संचार करता येतो [ कलम १९ (१) (ई) व (ड) ]. ह्यामुळे प्रादेशिक भाषांचेच माध्यम जर उपलब्ध असेल तर अशा लोकांवर अन्याय होईल. शिवाय सर्वोच्च न्यायालयाच्या गुजरात विद्यापीठ **विरुद्ध** श्री. कृष्णा (ऑल इंडिया रिपोर्टर, १९६३, सर्वोच्च न्यायालय, पान ७०३) ह्या खटल्यातील निर्णयात असे म्हटले आहे की, राज्य विधानसभेस प्रादेशिक भाषेचे एकमेव माध्यम लादण्याचा अधिकार नाही. ह्यामुळे इंग्रजी किंवा हिंदी (जर हिंदीने इंग्रजीची जागा घेतली तर) आणि प्रादेशिक भाषा एवढ्या किमान दोन माध्यमांतून तरी शिक्षणाची सोय करावीच लागणार. इंग्रजी किंवा प्रादेशिक भाषा असा पेच नाहीच आहे. इंग्रजी आणि प्रादेशिक भाषा हेच धोरण घ्यावे लागणार आहे. प्रादेशिक भाषेचे अतिरिक्त माध्यम आणावे काय आणि आणावयाचे असल्यास, काय पूर्वतयारी करावी लागेल ह्याचा शोध घण्याचा ह्या लेखाचा उद्देश आहे.

### कायद्याच्या शिक्षणाला सामाजिक संदर्भ

इंग्रजी घालवा म्हणणारे जेवढे अतिरेकी आणि अव्यवहारी आहेत तेवढेच इंग्रजी हे एकमेव माध्यम असावे असे म्हणणारेही आहेत. भारतात इंग्रजी जाणणाऱ्यांची संख्या फार मर्यादित आहे. बहुजन समाजाला जर उच्च शिक्षणाचा लाभ मिळायचा असला तर, प्रादेशिक भाषेतूनच तो मिळायला हवा. पण इंग्रजीमुळे आपण आधुनिक विचार आणि तंत्रज्ञान

मिळवू शकतो. म्हणून इंग्रजीची खिडकी बंद करून टाकता कामा नये. प्रादेशिक भाषांतून दिलेले शिक्षण चांगल्या दर्जाचे असायला हवे. ते तसे होण्याकरिता चांगल्या ग्रंथांची निर्मिती होणे आवश्यक आहे. आपल्या भाषेत चांगले ग्रंथ निर्माण होण्याकरिता इंग्रजीतले ग्रंथ आपणास वाचता यायला हवेत. म्हणजे भारतीय भाषांच्या वृद्धीसाठी इंग्रजीची योग्य ती उपासना आवश्यक आहे.

कायदे शिक्षणाच्या काही विशिष्ट अडचणी आहेत. महाराष्ट्रात आणि इतर काही राज्यांत कायदे शिक्षण हे शासनाचे नावडते मूल आहे. विधि महाविद्यालयांना शासनाकडून काहीही अनुदान नाही. त्यामुळे जास्तीत जास्त विद्यार्थी व सर्व अर्धवेळचे प्राध्यापक ह्यांनी विधि महाविद्यालये संपन्न झाली आहेत. पूर्णवेळचे प्राध्यापक विधि महाविद्यालयांत फार थोडे आणि जे आहेत ते न्यूनगंडाने ग्रासलेले. कारण त्यांना कुणी प्राध्यापक म्हणून जमेलाच धरत नाही. केंद्र सरकारचे धोरण विधि शिक्षणाबाबत जास्त पुरोगामी आहे. दिल्ली विद्यापीठात पूर्णवेळचे प्राध्यापक, प्रपाठक व अधिव्याख्याता ह्यांची संख्या ४० च्या वर आहे. विधि शिक्षणाबाबतच्या मूलभूत प्रश्नांचा विचार कोण करणार ? अर्धवेळचे प्राध्यापक व्यवसायाने वकील असल्याने त्यांना अभ्यासक्रमाची सुधारणा, माध्यमाचा प्रश्न ह्यांकडे बघायला वेळ असणे शक्य नाही. महाराष्ट्रात पूर्णवेळच्या प्राध्यापकांची संख्याच फार मर्यादित असल्याने कायदेशिक्षणाबाबत कुठलीही सुधारणा होऊ शकलेली नाही. आहे तीच पद्धत चालू ठेवण्याकडे कल आहे. कारण विधि महाविद्यालय हे शिक्षणाकरिता नसून पैसा मिळवण्याचे आणि तेही कमीत कमी गुंतवणुकीवर, उत्तम साधन आहे. कायदा हे सामाजिक परिवर्तनाचे साधन आहे. कायद्याच्या शिक्षणाला सामाजिक संदर्भ असतो.

**कायदे तज्ञ : सामाजिक अभियंता**

कायदा शिक्षणाचे प्रमुख ध्येय चांगले कायदेतज्ञ तयार करणे हे होय. अशा कायदेतज्ञांची गरज वकील, न्यायाधीश, प्रशासक आणि राजकीय

नता ह्या विविध पातळ्यांवर पडत असते. लोकशाही समाजात तर कायदे-तज्ज्ञाला विशेष महत्त्व असायला हवे. कारण सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेला तो नवीन अर्थ देऊ शकतो. अमेरिकेतील प्रख्यात कायदेपंडित रास्को पाऊंड ह्यांनी कायदेतज्ज्ञाला सामाजिक अभियंता ( Social Engineer ) म्हटले आहे. 'कायद्याचे राज्य' या कल्पनेला जर खरा अर्थ लाभायचा तर कायद्याच्या माध्यमाचा जास्त डोळसपणे उपयोग व्हायला हवा. आणि ह्याकरिता कायद्याची संस्कृती (Legal Culture) निर्माण व्हावी लागते. कायद्याची संस्कृती म्हणजे कायदे व कायद्यांचे वितरण करणाऱ्या संस्था ह्याबाबत योग्य ती सामाजिक भूमिका निर्माण होणे. ती होण्याकरिता कायद्याच्या माध्यमावरील सामान्यांचा विश्वास वाढायला हवा. आज अनेक कल्याणकारी कायदे फक्त कागदावर राहतात. कारण सामाजिक मूल्ये आणि कायदे ह्यांत फार तफावत आहे. ही तफावत दूर करण्यासाठी योग्य त्या कायदे संस्कृतीची निर्मिती व्हावी लागते. आणि ह्या संदर्भात कायद्याच्या शिक्षणाचे कार्य महत्त्वाचे आहे. मराठी माध्यमाचा शिक्षणासाठी उपयोग ह्या दृष्टीने फार महत्त्वाचा. मराठीत (तसेच इतर प्रादेशिक भाषांत) कायदा शिकवला जाण्याने कायदा समाजाच्या जवळ जाईल. कायदा आणि समाज ह्यातील अंतर कमी होईल. शिवाय कायदा शिक्षणाचे मराठी माध्यम झाले तर न्याया-लयीन प्रक्रियेचे मराठीकरणही जास्त शास्त्रशुद्ध आणि सोपे होईल.

आज कायदे मुख्यत: इंग्रजी भाषेत केले जातात, त्याच भाषेत शिक-वले जातात आणि त्यांच्या कार्यवाहीची प्रक्रियाही त्याच भाषेतून होते. ज्या समाजात इंग्रजी जाणणाऱ्यांची संख्या फारच थोडी आहे, तेथल्या कायद्याची आणि न्यायालयांची भाषा इंग्रजी असणे लोकशाही आणि सामाजिक न्याय ह्या दोन्ही मूल्यांशी विसंगत आहे. बहुजन समाजाला समजते त्या लोकभाषेत राज्यव्यवहार होणे आणि पर्यायाने न्याय-व्यवहारही होणे ही अगदी किमान गरज आहे. आपल्या देशात कायद्या-बद्दल प्रचंड अज्ञान आहे. ह्या अज्ञानाचे एक कारण हे की, हे कायदे इंग्रजी भाषेतच लिहिले जातात. अलीकडे ते प्रादेशिक भाषांतूनही

उपलब्ध होऊ लागले आहेत. पण ह्या भाषा इतक्या बोजड आहेत की, सामान्य माणसाला त्यांपासून काहीही बोध होणे शक्य नाही. कायद्याच्या शिक्षणाचे माध्यम मराठी झाल्याशिवाय कायद्याला आवश्यक ती मराठी परिभाषा तयार होणार नाही.

**महाराष्ट्रात कायदे शास्त्रज्ञांची परंपरा नाही**

पण कायदा शिक्षणाचे माध्यम मराठी व्हायचे असेल तर त्याकरिता मराठीत कायदेशास्त्रावरील ग्रंथ निर्माण व्हायला हवेत. आपल्याकडे इंग्रजी माध्यम गेली शंभर वर्षे असूनसुद्धा इंग्रजीतही फारशी उच्च प्रतीची पुस्तके लिहिली गेलेली नाहीत. जी पुस्तके आज आहेत ती कायद्याच्या कलमांवर केलेल्या टिपणीच्या स्वरूपाची आहेत. विषयाचे सुसूत्र आणि सम्यक् ज्ञान देणारे आणि सामाजिक संदर्भात कायद्याचे विवेचन करणारे लेखक फारच दुर्मिळ. इंग्रजी भाषेत लिहिलेल्या ग्रंथांचेच (म्हणजे वरील गुण असलेल्या ग्रंथांचे) प्रमाण आणि संख्या इतकी अल्प तर मराठीत काय परिस्थिती असेल ? ह्याचे मुख्य कारण कायदेशास्त्रज्ञांची परंपराच महाराष्ट्रात निर्माण झालेली नाही. जे काही थोडे शास्त्रज्ञ झाले ते केवळ अपघाताने. आणि त्यांचे कार्यही मुख्यत: असलेल्या कायद्याची प्रामाणिक माहिती देण्यापलीकडे गेले नाही. चिकित्सक समीक्षा करणारे कायदेशास्त्रीय लेखन जवळ जवळ झालेलेच नाही असे म्हटल्यास फारसे चूक ठरणार नाही.

मराठी माध्यमातून कायदा जर शिकवायचा असला तर कायदे शिक्षणाबद्दलच मूलगामी विचार होणे जरूर आहे. तसा तो शासनाने व विद्यापीठांनी केला पाहिजे. ऑल इंडिया बार कौन्सिलने केलेल्या शिफारशींची कार्यवाही होत नाही. गुणवत्ता सुधारण्याचा कुठलाच प्रयत्न होताना दिसत नाही. नवीन होणाऱ्या वकिलावर नवीन समाजाच्या मूल्यांचे संस्कार होणे आवश्यक आहे. हे संस्कार जसे वकिलांवर व्हायला हवेत तसेच सामान्य माणसावरही व्हायला हवेत. ह्याकरता कायदेशिक्षणाची पुनर्रचना करायला हवी. कायद्याचा सल्ला मोफत देण्याची

योजना महाराष्ट्र सरकारने नुकतीच जाहीर केली आहे. ह्या योजनेची कार्यवाही सामाजिक न्यायाच्या तत्त्वांशी बांधिलकी असलेले कायदेतज्ञच करू शकतील.

मराठी माध्यमाची सोय केल्यास विद्यार्थ्याला इंग्रजीत लिहिलेल्या न्यायपत्रिका व ग्रंथ वाचता येतील व त्यातील आशय समजून घेता येईल ह्याकरता इंग्रजी भाषेचेही पुरेसे ज्ञान हवेच. सबंध भारताची कायदे पद्धती एकात्म आहे. सर्वोच्च न्यायालय सर्व देशाचे उच्चतम न्यायालय आहे. ह्या न्यायालयाचे निर्णय आणि कामकाज इंग्रजीतच चालते व तसे ते बराच काळ चालेल असे वाटते. उच्च न्यायालयांची अपिले सर्वोच्च न्यायालयाकडे जात असल्याने त्या न्यायालयांनाही आपल्या न्यायपत्रिका इंग्रजीतच लिहाव्या लागतील. त्यामुळे वरच्या पातळीवर म्हणजे उच्च न्यायालय हे आहे. त्याला स्वतःची प्रादेशिक भाषा तर यायलाच हवी पण इंग्रजीही यायला हवी. ह्याचे भान कायद्याच्या शिक्षणाची पुनर्रचना करताना सोडून चालणार नाही. परंतु माध्यमाचा प्रश्न हा केवळ भाषा-भिमानाच्या भूमिकेवरून बघून चालणार नाही. मराठी माध्यमाचा जास्त प्रसार तर झाला पाहिजेच पण मराठी माध्यम कशासाठी ह्याचा विचार करायला हवा. मराठी माध्यमामुळे विषयाची समजूत वाढायला हवी. म्हणजेच शिक्षणाचा दर्जा आहे त्यापेक्षा जास्त चांगला व्हायला हवा.

# राजभाषा मराठीचा वाद

*बार्शी येथे झालेल्या ५४ व्या मराठी साहित्य संमेलनात २-२-१९८० रोजी 'राजभाषा कशी असावी, कशी नसावी' ह्या विषयावर एक परिसंवाद झाला. त्या ठिकाणी प्रस्तुत लेखकाने जे अध्यक्षीय प्रास्ताविक आणि समारोप केला ती दोनही भाषणे एकत्र करून आणि त्यात थोडी भर घालून हा लेख तयार केला आहे. भाषणांची तयारी करताना डॉ. सुहासिनी लद्दू आणि पुणे सकाळ कार्यालय ह्यांनी काही लेखांची कात्रणे उपलब्ध करून दिली याबद्दल लेखक आभारी आहे.*

## पूर्वपीठिका

**महाराष्ट्राची** राजभाषा यादवकाळात मराठी होती. त्यानंतर बहामनी राज्य आणि त्याच्या विघटनामधून उत्पन्न झालेली निजामशाही आणि आदिलशाही राज्ये यांमधून फारशी ही राजभाषा झाली. मराठी आणि दखनी-उर्दू ह्या भारतीय-आर्य भाषाकुलामधल्या भाषा काही अंशी वापरल्या गेल्या तरी त्यामधून राज्यकारभार आणि न्यायव्यवहार

ह्यासाठी फारसीमधून आयात केलेल्या शब्दांचा भरणा अतिशय वाढला. मुगल बादशाहीच्या विघटनामधून नंतर उत्पन्न झालेल्या आणि महाराष्ट्राचा बराच भाग व्यापून असणाऱ्या आसफजाही राज्यात म्हणजे निजामीत तीच स्थिती राहिली. अरबी शब्दांचा वेगळा उल्लेख नाही, कारण अरबी शब्द फारसीमार्फतच असल्याचे दिसते. तडक अरबीमधून कागद तर फारसीमार्फत कागज अशा जोडया फार तुरळक आहेत. मराठेशाहीच्या स्थापनेच्या वेळेलाच शिवाजीने मराठी राज्यभाषा म्हणून आणण्याचा उपक्रम केला. रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्याकडून 'राज्य व्यवहार कोश' हा पारिभाषिक फारसी-संस्कृत कोश करवून घेतला. त्याचा परिणाम म्हणून राज्यकारभारातील मराठीमधील फारसी शब्दांचे प्रमाण बरेच घटल्याचे दिसून येते. हा प्रयत्न संस्कृतवर जादा भिस्त ठेवल्याने फसला आणि मराठीतून राज्यकारभारविषयक असे फारसीमधून आलेले शब्द जसेच्यातसे राहिले अशी एक समजूत दिसते ती बरोबर नाही. फारसी शब्द घटले म्हणजे हद्दपार झाले असे अर्थातच नाही. संस्कृतमधून घेतलेले तत्सम शब्द आणि संस्कृतप्रचुर भाषा ही कोणत्याही प्रौढ कामाला योग्य आणि साधी, तद्भव शब्द आणि देशी शब्द ह्यांच्यावर विसंबणारी भाषा ही प्राकृतजनांसाठी योग्य असा त्या वेळचा हिशोब होता. मोरोपंतांनी पहिल्या शैलीत महाभारत लिहिले तर दुसऱ्या शैलीत सीतागीत, सावित्रीगीत ही लिहिली. शिवाजीपेक्षा संभाजीचे शिक्षण अधिक स्वस्थतेने झालेले असल्यामुळे त्याचा ओढा संस्कृताकड अधिक दिसतो. राज्यकारभार हे अर्थात प्रौढ कार्य गणले जात असे. आजही हा हिशोब आपल्या मनातून पूर्णत: गेलेला नाही. लोकशाहीमध्ये राज्य हे प्राकृतजनांसाठी असते हा नवीन तपशील मात्र प्रस्थापित होत आहे. आजच्या काळाच्या कल्पना त्या काळातील घटनांचा अन्वयार्थ लावताना जपूनच लावल्या पाहिजेत. ब्रिटीश राजवट आल्यानंतर साधारणत: जिल्हा पातळीपर्यंतचा राज्यकारभार प्रादेशिक भाषेमध्ये आणि प्रांतिक आणि अखिल भारतीय पातळीवरचा कारभार इंग्लिशमध्ये ही वाटणी राज्यकर्त्यांनी केली. राज्यकारभारातल्या मराठीमध्ये इंग्लिश शब्द बरेच-

शिरले. न्यायव्यवहारात मात्र फारसीमधून आलेल्या व आतापर्यंत टिकून राहिलेल्या शब्दांचे स्थान कायम राहिले. महाराष्ट्रातल्या संस्थानांत हीच संस्कृत-फारसी-इंग्लिश शब्दांचा उपयोग करणारी मराठी भाषा राज्यकारभारासाठी सामान्यत: वापरली जात असे. जंजिरा संस्थानात कदाचित वेगळी स्थिती असू शकेल. निजामीबद्दल पूर्वी सांगितलेच आहे.

१९४७ मध्य भारताला स्वातंत्र्य मिळाले. स्वातंत्र्य चळवळीच्या ओघात भाषावार प्रांतरचना आणि देशी भाषांचा राज्यकारभारात उपयोग हे विचार पुढे आले होते. माधव ज्यूलियन ह्यांच्या मराठी भाषेच्या गौरवगीतात 'जरी ती राजभाषा नसे' ह्या शब्दांत व्यक्त केलेली खंत आणि सूचित केलेली उमेद ह्या विचारांच्या संदर्भातच उमजते. ह्या दोन्ही विचारांना प्रत्यक्षात आणण्याचा प्रश्न येताच त्यांना छेद देणारे इतर विचार आणि इतर प्रवृत्ती उदाहरणार्थ आळस, हातातला ससा सोडण्याचा पारध्याने केलेला कंटाळा, पुढे आल्या. १९६० मध्ये महाराष्ट्र राज्य आजच्या स्वरूपात स्थापन झाले आणि मराठी ही राज्यपातळीवर म्हणजे पूर्वीच्या भाषेत प्रांतिक पातळीवर राजभाषा म्हणून मान्य होण्याच्या प्रश्नाला जोराची चालना मिळाली.

प्रश्नाला चालना मिळाली आणि उत्तरे शोधताना फाटे फुटले. मराठी ही राजभाषा म्हणून खरोखरीच करावी का हा पहिला प्रश्न आणि त्याचे उत्तर होकारार्थी आल्यास ती राजभाषा कशी असावी, कशी नसावी हा दुसरा प्रश्न. दुसऱ्या प्रश्नाची दोन उत्तरे मिळाली. ती संस्कृत आणि संस्कृतप्रचुर हिंदीकडे झुकलेली असावी हे एक उत्तर, आणि राजभाषा मराठीने आपले देशी मराठी वळण सोडू नये हे दुसरे उत्तर. एकूण हिशो-बात इंग्लिशधार्जिणा, संस्कृतधार्जिणा आणि मराठमोळाधार्जिणा असे तीन पक्ष पुढे आले. मराठी भाषा ही उपचारापुरती राजभाषा करायला इंग्लिशधार्जिण्या पक्षाचा विरोध नव्हता हे विशेष. कदाचित एकंदर भारतीय मनाची उपचारप्रियता लक्षात घेता हे विशेष नसून स्वाभाविकच आहे असे म्हणायला पाहिजे. किंबहुना नंतरच्या वादात इंग्रजीधार्जिणा पक्ष हिरीरीने भाग न घेता बाजूला राहून टीकाटिप्पणी करण्यात समाधान

मानतो असे दिसते. फाट फुटल्यामुळे प्रश्न काहीसा रेंगाळला हे खरे, पण त्याचबरोबर प्रश्नाच्या निरनिराळ्या बाजूही पुढे आल्या आणि त्याचे सोपे धोपट उत्तर निघत नाही, हे लक्षात आले हे नाकारण्यात अर्थ नाही. लोकशाही राज्यप्रक्रियेत असे होणे स्वाभाविक आहे आणि इष्टही आहे.

ह्या वादाच्या पार्श्वभूमीवर १९६० नंतरच्या घटना पाहाव्या लागतील. हे सगळे वाक्य इंग्रजी आहे असे कुणी म्हटले तर? १९६१ साली भाषा संचालकांचे कार्यालय आणि भाषा सल्लागार मंडळ ह्यांची स्थापना झाली. राजभाषा मराठीसाठी पारिभाषिक संज्ञा तयार करण्याचे काम सुरू झाले. १९६२ साली कामाचा पहिला हप्ता म्हणून 'पदनाम कोश' बाहेर पडला. त्यावर प्र. के. अत्रे यांनी कडाडून हल्ला चढवला. राजभाषा ही संस्कृत-धार्जिणी नको, देशी वळणाची हवी हे मत त्यांनी मांडले. १९६५ मध्ये 'मराठी राजभाषा विधेयक' मांडले जाऊन संमत झाले. नंतर 'शासन व्यवहार कोश' ह्या पुस्तकाची कच्ची, गोपनीय आवृत्ती १९६८ साली निघाली आणि तिच्यावर अभिप्राय मागवण्यात आले. ती कच्ची आवृत्ती गोपनीय ठेवली नसती तर अधिक प्रमाणात आणि अधिक उपयुक्त अभि-प्राय मिळाले असते, असे वाटते. १९७३ साली सुधारलेली पक्की आवृत्ती प्रकाशात आली. वाद पुढे चालू राहिला. राज्यकारभाराच्या आणि न्यायव्यवहाराच्या परिभाषेचा प्रश्न आणि नैसर्गिक आणि मानवी विज्ञानाची आणि गणिताची परिभाषा, मराठी शैक्षणिक माध्यम म्हणून स्वीकारल्यावर कशी असावी, हा प्रश्न – हे दोन्ही प्रश्न काहीसे एकत्र झाले. वैज्ञानिक परिभाषेच्या प्रश्नासंबंधीही तसेच तीन पक्ष उभे राहिले हेही पाहण्याजोगे आहे. १९७९ साल हे भारत सरकारच्या सूचनेप्रमाणे राजभाषा वर्ष म्हणून साजरे झाले. खरे म्हणजे शासकीय व्यवहार कोशा-नुसार भारत सरकारच्या निदेशाप्रमाणे असे म्हटले पाहिजे. नाहीपेक्षा 'डायरेक्टिव्ह' च्या ऐवजी 'इन्स्ट्रक्शन' हा चुकीचा अर्थ निघायचा. त्या निमित्ताने सरकारी आणि बिनसरकारी पुढाकाराने भाषणे, लेख, चर्चासत्रे इत्यादींच्या रूपाने राज्यकारभाराची परिभाषा आणि तिच्या-

संबंधाने मागे उल्लेखिलेले तीन पक्ष ह्यांच्या विचाराला जोरदार चालना मिळाली.

## आतापर्यंतच्या चर्चेचा थोडक्यात आढावा

संस्कृतधार्जिणा पक्ष, मराठमोळाधार्जिणा पक्ष आणि इंग्रजीधार्जिणा पक्ष असे तीन पक्ष ओळखले जातात हे खरे; पण ते पक्ष कोणकोणते मुद्दे मांडतात ह्याचा परामर्श घेण्याच्या अगोदर एक दोन गोष्टी स्पष्ट केलेल्या बऱ्या. पहिली म्हणजे ही मुद्द्यांची विभागणी विचारांच्या सोयीसाठी केलेली आहे. त्या विभागणीला गैरवाजवी महत्त्व देऊ नये. दुसरी म्हणजे ह्या तीन पक्षांना डकवली जाणारी ही लेबले तितकीशी बरोबर नाहीत हे त्यांच्याकडून मांडल्या जाणाऱ्या मुद्द्यांचे परीक्षण केल्यावर ध्यानात यावे. ब्राह्मणी पक्ष, मराठा पक्ष आणि नोकरशहा पक्ष ही लेबले तर वस्तुस्थितीपासून आणखीनच दूर जातात—ती बाजूलाच ठेवलेली बरी.

पहिला पक्ष आणि दुसरा पक्ष ह्यांचे एका गोष्टीवर एकमत आहे ते म्हणजे मराठी ही खरोखरीची राजभाषा व्हायला पाहिजे आणि ती लवकर व्हावी यासाठी ह्या प्रक्रियेला मुद्दाम गती द्यायला पाहिजे. निराळ्या शब्दांत सांगायचे तर हे दोन्ही पक्ष भाषिक नियोजनाचा पुरस्कार करतात.

दोन्ही पक्षांत अंतर आहे ते ह्या नियोजनाच्या स्वरूपाबद्दल आहे. पहिल्या पक्षाचे म्हणणे भाषा पाहिजे तशी नियंत्रित करावी. आज ना उद्या ती लोकांच्या गळी उतरेल. तसे होणे त्यांच्या हिताचे आहे. संस्कृतची कास धरणे किंवा हिंदीचे अनुकरण करणे हा तपशिलाचा भाग झाला. त्याला नियंत्रण वा पक्ष म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. ह्याउलट दुसऱ्या पक्षाला भाषेच्या स्वाभाविक प्रक्रियेवर भिस्त ठेवून नियोजन करणे अधिक वाजवी आणि अधिक लोकाभिमुख धोरण आहे असे वाटते. मर्यादित नियोजनवादी पक्ष हे नाव दुसऱ्या पक्षाला अधिक योग्य होईल. देशी आणि तद्भव शब्दांचा पुरस्कार हा साधनविचार झाला. तुलनेने तिसरा पक्ष अधिक स्थितिप्रिय आहे. भाषिक नियोजनावर आणि कृत्रिम गती देण्यावर त्याचा विश्वास नाही. जिल्हा पातळीवर मराठी आणि

राज्य पातळीवर इंग्रजी ही आजवरची व्यवस्था काय वाईट आहे असा प्रश्न ही मंडळी विचारतात.

केवळ आपापल्या नजीकच्या स्वार्थाचा विचार करून काही मंडळी यातला एक पक्ष निवडत असणार. परंतु वैचारिक पातळीवर हेतूंचे आरोप करण्याचा मोह टाळला नाही, तर वादामधून व्हायचा अपेक्षित तत्त्वबोध आणि कार्याची दिशा ठरणे आपल्यापासून अधिकच दूर पळणार.

नियंत्रणवादी आपल्या बाजूने पुढील मुद्दे मांडत असतात—

१. स्वाभाविक प्रक्रियेला आता फारसा अवसर नाही. पाश्चात्य देशात प्रादेशिक भाषा राजभाषा म्हणून स्थिर व्हायला चारपाच शतके मिळाली : आपल्याजवळ चारपाच दशकेदेखील नाहीत. ज्याला इंग्रजी येतच नाही त्याच्या आपण देऊ तो शब्द अंगवळणी पडेल. ह्या बाबतीत हिंदी भाषिकांचा कित्ता मराठी लोकांनी ठेवावा. चोचले न करता निमूट सरकारी परिभाषा स्वीकारावी असाही उपदेश मात्र जेव्हा करण्यात येतो तेव्हा असे म्हणावेसे वाटते की, मराठी लोक आपल्या भाषेबद्दल चोखंदळ जागरुकपणा दाखवू लागले तर त्याबद्दल एवढी नापसंती दाखवायची काय जरूरी आहे ? त्याऐवजी हिंदी-भाषिकांची त्यांच्या फाजील सहनशीलतेबद्दल कीव का करू नये ?

२. सोपेपणाचे फाजील स्तोम माजवू नये. सामान्य माणूस इतका बुद्दू आहे की चार अपरिचित शब्दांनी तो बुजेल ? त्याच्यावर थोडा विश्वास टाका की !

३. सोपेपणा म्हणजे केवळ जोडाक्षरे टाळणे नव्हे. विविध अर्थच्छटांना विविध शब्द, जुळत्या अर्थासाठी जुळती शब्दरूपे ह्यांचा विचार करायला नको का ? 'विधी' शब्दावर पाणचट कोटया करण्यापेक्षा वैध, अवैध, विधेयक इत्यादी शब्दसाधना आणि उपविधी, अधिनियम, अध्यादेश, संविधी, नियम अशा बारकाव्यांची सोय लक्षात घ्याल तर बरे.

४. भारताची भाषिक एकात्मता इंग्रजी किंवा फारसी ह्या परकी भाषांपेक्षा संस्कृत ह्या भारतीय भाषेवर आधारावी हे चांगले.

५. राजभाषेला काही भारदस्तपणा नको का ? झाडूवाला, कारकून, डुक्करवाडा-अधिकारी ह्यापेक्षा स्वच्छक, लिपिक, सूकरालय-अधिकारी असे म्हटले तर त्या त्या लोकांचा कसे मान ठेवल्यासारखे वाटते.

थोड्या विचारांती यातले मुद्दे १, २, ३ विचार करण्याजोगे आहेत, तर ४, ५ ठिसूळ आहेत हे पटेल.

मर्यादित नियोजनवादी आपल्या बाजूने पुढील मुद्दे मांडत असतात—

१. भाषिक नियोजन करावे आणि तसे करून मराठीची राजभाषा म्हणून क्षमता वाढवायला पाहिजे हे मान्य. पण ज्याच्यासाठी हे सर्व करावयाचे त्या सामान्य नागरिकाला शासकीय परिभाषा कळली आणि उमजली नाही तर हा सर्व खटाटोप व्यर्थ नव्हे का ?

२. सामान्य नागरिकाच्या अडीअडचणींबद्दल सहानुभूती असेल तरच भाषिक दुरावा राज्यव्यवहाराला किती घातक आहे हे पटेल. सवयीने सर्व अंगवळणी पडते असे म्हणण्याचा अर्थ सामान्य नागरिक वाटेल ती गळचेपी सहन करतो असा तर नाही ना ?

३. मराठी भाषा म्हणजे पर्यायाने मराठी-भाषिक ह्यांच्या उपक्रमशीलतेवर विश्वास टाका. भाषांतरावर मराठीचे पोषण किती दिवस करणार ? 'दहा दशलक्ष' हे 'टेन मिलियन' चे आंधळे भाषांतर कशाला ? त्यापेक्षा मराठीतच विचार केला तर 'एक कोटी' म्हणायचे सहज सुचले असते.

४. मराठीने संस्कृत, फारसी, इंग्रजी ह्या भाषांचा सासुरवास इतके दिवस सोसला, आता नवीन हिंदीचे आक्रमण नको. मराठीचे मराठीपण टिकवा.

ह्या मुद्द्यांपैकी १, २, ३ विचार करण्याजोगे आहेत. ४ हा केवळ भावनेला आवाहन करणारा आहे. 'मराठीचे मराठीपण इतके तकलुपी आहे की काय, की दुसऱ्या भाषांतून आयात केल्यावर ते कोसळावे ?' असे उलट भावनिक आवाहन केल्यावर त्याला छेद जातो.

स्थितिप्रियतावादी आपल्या बाजूने पुढील मुद्दे मांडत असतात--

१. आपले पाय वास्तवाच्या भुईवर जरा टेकवा. भाषा आणि विशेषत: परिभाषा हे साधन आहे, साध्य नाही. जिचा आशय ऐकणाऱ्यापर्यंत पोचत नाही अशा पोकळ परिभाषेचा दिमाख कशाला ?

२. मराठीची अभिवृद्धी इतर भाषांचा द्वेष करून होणार नाही. इतर भाषांतून शब्द आयात करताना फाजील सोवळे न पाळल्यामुळे तर इंग्लिश भाषा समृद्ध झाली नाही का ? इंग्रजी किंवा फारसी ह्या भाषांचा द्वेष करून काय साधणार ?

३. भारतातल्या सामान्य नागरिकाला बऱ्याच अधिक महत्त्वाच्या नव्या गोष्टी शिकायच्या आहेत. त्यात नवीन परिभाषा ओझे होऊन बसणार असेल तर ती काय कामाची ?

४. राज्यकारभारात नेमकेपणाला फार महत्त्व आहे. इंग्लिश भाषेने तो इतक्या वर्षानंतर कमावला आहे. तिचा आधार टाकून आपले भागणार नाही.

ह्या मुद्द्यांपैकी १, २ हे सबळ आहेत, ३ व ४ हे त्या मानाने अर्ध-सत्यावर आधारलेले असे आहेत.

प्रत्येक पक्षात टोकाला जाऊन बोलणारी मंडळी आहेत. त्यांच्याकडे दुर्लक्ष केले तर प्रत्येक पक्षाकडून हातात धरण्यासारखे मुद्दे आपल्याला मिळतात आणि राज्यभाषेच्या प्रश्नाची निरनिराळी अंगे आपल्या ध्यानात येतात.

## भारताच्या इतर राज्यांकडे थोडा दृष्टिक्षेप

शासकीय परिभाषेचा प्रश्न किंबहुना शासकीय, वैज्ञानिक, तंत्रविद्येच्या अशा सर्वच परिभाषेचा प्रश्न एकट्या मराठीलाच पडला आहे असे नव्हे. भारतामध्ये इतर भाषा बोलणारे लोक, भारताबाहेरच्या इतर विकसन-शील आणि अविकसित देशातले लोक, यांनाही तो कमी अधिक प्रमाणात पडला असणारच.

सध्या आपण केवळ भारतातल्या काही राज्यांकडे ओझरती नजर टाकू आणि आपल्याला काही बोध घेता येईल का ते पाहू.

पंजाबमध्ये मुख्यत: पंजाबी भाषा बोलली जाते. भारतातल्या काश्मिरी, उर्दू, सिंधी आणि काही अंशी पंजाबी ह्या भाषांचा मोहरा संस्कृतपेक्षा फारसीकडे वळलेला आहे. आपली भाषा साधी ठेवायची का फारसी-प्रचुर ठेवायची असा प्रश्न त्यांच्यापुढे असतो. पाकिस्तानी उर्दूला अति-फारसी अरबीप्रचुर म्हणून भारतामध्ये उर्दूभाषी नाके मुरडतात. पंजाबमध्ये आता मुसलमान फारसे नाहीत, शिखांचा ओढा पंजाबी आणि फारसीकडे तर हिंदूंचा आर्यसमाजी विचारांच्या छायेत हिंदी आणि संस्कृतकडे, अशी स्थिती आहे. हळूहळू पंजाबीही हिंदीच्या किंवा उर्दूच्या वरचष्म्यातून बाहेर पडून स्थिर होते आहे. मात्र परिभाषेसाठी संस्कृतकडे वळण्याची प्रवृत्ती वाढते आहे. उदाहरणार्थ 'इकनॉमी' साठी 'मुआशीमुआमला' ऐवजी 'संजम' शब्द वापरतात.

हिंदी भाषेची प्रवृत्ती अधिकाधिक संस्कृतप्रचुर होण्याकडे आहे. मराठीमध्ये 'निवडणूक' हा सोपा शब्द असताना हिंदीमधला 'निर्वाचन' शब्द कशाला घ्यायचा अशी तक्रार करताना आपण हे लक्षात घेत नाही की काही थोडे हिंदी भाषिक नेमके, तसेच काही म्हणत आहेत. 'चुनाव' हा सोपा शब्द असताना संस्कृतमधला 'निर्वाचन' हा शब्द कशाला घ्यायचा? दुर्दैवाने असे जागरूक हिंदी भाषिक संख्येने पुरेसे नाहीत असे म्हणणे भाग आहे. हिंदी ही संघराज्याची भाषा असल्यामुळे ह्या प्रश्नात एक दुसरा तिढा येतो त्याचा मात्र उल्लेख करायला पाहिजे. 'चुनाव' म्हणणारी हिंदी सामान्य हिंदी भाषिकांना सोपी होईल. उलट 'निर्वाचन' म्हणणारी हिंदी, द्रविड भाषिकांना कदाचित कमी अवघड वाटेल. आता हिंदी भाषेने करावयाचे काय?

मलयालम, कन्नड आणि तेलुगू ह्या द्रविड भाषिकांना जरूर तिथे संस्कृतमधून शब्द उचलायला संकोच वाटत नाही. मात्र तामिळ भाषि-कांना तो अलीकडे वाटू लागला आहे असे दिसते. शब्दाची जरूरी भासली

तर काहीजण प्राचीन तामिळकडे वळतात, कधी ह्याचा अतिरेक होतो, आणि ही ‘ अतिशुद्ध ’ तामिळ आम्हाला समजत नाही अशी सामान्य वाचक किंवा श्रोता तक्रार करतो.

विविध भारतीय भाषांनी संस्कृतमधून घेतलेल्या शब्दांची पाहणी केली तर एकाच संस्कृत तत्सम शब्दाचे निरनिराळ्या भाषांत निरनिराळे अर्थ ही परिस्थिती अनेकदा दिसते. उदाहरणार्थ ‘ चेष्टा ’ म्हणजे बांगला, हिंदी यांमध्ये ‘ प्रयत्न ’ मराठी, तेलुगू यांमध्ये ‘ मस्करी ’. इंग्रजी शब्दांच्या प्रतिशब्दात हे विशेष आढळते—‘ हिस्टरी ’ साठी मराठीत ‘ इतिहास ’ तर तेलुगूमध्ये ‘ चरित्रम्. ’ ‘ कल्चर ’ साठी ‘ संस्कृती ’ हा राजवाड्यांचा शब्द मराठीतून रवींद्रनाथ ठाकूरांपर्यंत इतर भाषांत फैलावला; संस्कृतची कास धरून एकरूपता साधेलच असे नाही असे यावरून दिसते.

बंगालचे उदाहरण उल्लेखनीय आहे. परिभाषा स्वाभाविक रीतीने तयार व्हायला बांगला भाषिकांना जी काही दशके मिळाली ती त्यांनी पुरेपूर वापरली. विविध वैज्ञानिक आणि इतर विषयांवर ललितेतर वाङ्मय बांगला भाषेत बऱ्याच वर्षांपासून विपुल निर्माण होत आले आहे. उलट मराठीचा प्रकाशन संसार म्हटले की मुख्यत: शालेय पाठ्य-पुस्तके आणि ललित वाङ्मय आपल्या डोळ्यासमोर येतात. मराठी वाचकही ह्या दारिद्र्याला जबाबदार आहेत. बंगाल्यांचे स्वभाषाप्रेम काही वेळा अतिरेकी होऊ पाहते. मात्र ते त्यांच्या इंग्लिश भाषेच्या उपयोगाच्या आड आलेले नाही. भारतामध्ये जी इंग्लिश पुस्तके लिहून प्रसिद्ध होतात त्यात संख्या व गुणवत्ता ह्यांच्या बाबतीत दोन्ही भाषांतून विपुल लेखन करणारे धनंजयराव गाडगिळांसारखे लेखक तर फारच थोडे. उलट केवळ मराठी भाषेत लेखन केल्यामुळे आणि त्याच्या इंग्लिश भाषांतराची व्यवस्था न झाल्यामुळे महाराष्ट्राबाहेर अज्ञात राहिलेले विद्वान पुष्कळ आहेत. स्वभाषाप्रेम आणि इंग्लिश भाषेचा द्वेष ह्यांचे समीकरण होण्याचे कारण नाही. थोडे खोलवर गेले तर असे म्हणता येईल की, मराठी माणसांमध्ये दिसणारा इंग्लिशचा भोळा सोस आणि इंग्लिशचा आंधळा द्वेष हे दोन्ही एकाच न्यूनगंडाचे आविष्कार आहेत. ते दारिद्र्य आणि हा न्यूनगंड—दोन्ही

वाबतीत मराठी लोकांनी कठोर आत्मपरीक्षण करण्याची वेळ अजून टळलेली नाही. ती न टळो.

**राजभाषेच्या प्रश्नाच्या संबंधाने काही लक्षवेधी सूचना**

ह्याप्रमाणे थोडा ऐतिहासिक आणि भौगोलिक आढावा घेतल्यानंतर राजभाषेच्या प्रश्नाची काही दुर्लक्षित अंगे नजरेसमोर आली. त्यांची नोंद आता केली पाहिजे. ही नोंद मी चार लक्षवेधी सूचनांच्या रूपाने करणार आहे. ह्या वादविवादामधील पहिली उणीव मला जाणवते ती ही की, शासकीय परिभाषा हा राजभाषेच्या प्रश्नाचा केवळ एक उपप्रश्न आहे याची पुरेशी जाणीव झालेली नाही. राजभाषेला परिभाषेखेरीज इतरही तीन अंगे आहेत ह्याचा विसर पडायला नको. त्यांच्यापैकी पहिले म्हणजे परिभाषेबाहेरचे इतर साधे शब्द. पारिभाषिक संज्ञांमुळे कितीही नाही म्हटले तरी भाषेला थोडा जडपणा येणे अटळ आहे. ह्यावर उतारा म्हणून इतर शब्द सोपे ठेवण्याची विशेष खबरदारी घेणे जरूर आहे. 'दृष्टोत्पत्तीस येतात' कशाला म्हणायचे 'दिसून येते' ठीक आहे. 'हा दुर्दैवी विचार आहे' म्हणजे काय ? 'अन्फॉर्चूनेट आयडिया' ह्या इंग्रजी शब्दप्रयोगाचे हे दुर्दैवी भाषांतर आहे हे लक्षात आल्याखेरीज त्याचा अर्थ ध्यानात येणार नाही. त्याऐवजी संदर्भानुसार 'करंटा विचार', 'वेडगळ कल्पना' असा मराठी वळणाचा शब्दप्रयोग केला तर ही अडचण येणार नाही. राजभाषचे दुसरे अंग म्हणजे वाक्याची मोडणी. शब्द सुबोध पण वाक्य दुर्बोध असा प्रकार होऊ शकतो. 'अशाच अधिकाऱ्याला हुकूम रद्द करता येईल की, ज्याने तो मुळात दिला आहे.' हे वाक्य आडवळणी आहे. 'ज्या अधिकाऱ्याने मुळात हुकूम दिला आहे त्यालाच तो रद्द करता येईल' असे म्हणून काही बिघडत नाही, उलट अर्थ चटकन लक्षात येतो. तिसरे आणि महत्त्वाचे अंग म्हणजे शासकीय भाषाशैली. ती नेमकी आणि सुटसुटीत असावी. परंतु शासकीय भाषाशैली हमखास शब्दबंबाळ आणि मुख्य मुद्द्याला स्पर्श करायला आळस करणारी होऊ पाहते. ब्रिटनमध्ये सर अर्नेस्ट गावर्स यांनी तर याबद्दल

एक मोहीमच उघडली होती. "कंप्लीट प्लेन वर्ड्ज" हे त्यांचे पुस्तक राजभाषा मराठीसंबंधी विचार करणाऱ्यांनी अवश्य डोळ्यां-खालून घालावे. भारतीय राजभाषेतही हा दुर्गुण खासच आढळतो. त्याचबरोबर ती पुष्कळदा अकारण उद्धट किंवा सौजन्यशून्य असते. "गलिच्छवस्ती निर्मूलन योजनेखाली आलेली ही सुधारित झोपडपट्टी आहे" अशी पाटी लावणाऱ्या कल्पनाशून्य अधिकाऱ्याची किती तारीफ करावी! लेखकांना उत्तेजन देण्यासाठी निर्मिलेल्या एका निमसरकारी योजनेतील करारपत्र कमालीचे उद्धट आणि कृपाळू आहे. ते वाचून दुखावलेली लेखिका मी पाहिलेली आहे. अर्थात शासकीय शैली हा शेवटी शासकाच्या व्यक्तिमत्वाचा आविष्कार असतो. पण पुष्कळदा त्यामागे भाषेच्या बऱ्यावाईट परिणामांबद्दल अज्ञान आणि बेफिकिरी असते. राजभाषेच्या वादात श्री. य. शं. कानिटकर यांचे मराठी किती चांगले आहे ह्याचा मुद्दाम उल्लेख अनेकांना करावासा वाटला हे जसे त्यांना भूषण आहे तसे सरकारी अधिकारीवर्गाला दूषण आहे. मराठीवर त्याला जसजसे प्रभुत्व मिळेल तसतसा त्याचा मराठीबद्दलचा कंटाळा दूर होईल.

राजभाषेबद्दल दुसरी लक्षवेधी सूचना अशी की, राजभाषा कशी असावी ह्याबद्दलचे निकष लावताना सब घोडे बारा टक्के असे करता येणार नाही. राजभाषा ही निरनिराळ्या संदर्भात वापरली जाते. आणि त्या त्या संदर्भात ती विशिष्ट गरजा भागवते आणि गरजांना अनुसरून तिच्याकडून वेगवेगळ्या अपेक्षा कराव्या लागतील. निदान वेगळ्या निकषावर जोर द्यावा लागेल. कायद्याच्या क्षेत्रात नेमकेपणाला महत्त्व आहे. सोपेपणाला त्या मानाने कमी महत्त्व आहे. एवढा ढोबळ विचार मांडला गेला आहे. पण तो पुरेसा नाही. कायदेमंडळाचे कामकाजही राजभाषेत चालते, प्रशासकांच्या भाषेइतकीच लोकप्रतिनिधींची भाषा सुधारण्याची जरूर आहे ह्याचा तर मंडळींना विसरच पडलेला दिसतो. सामग्र्याने विचार केला तर पुढीलप्रमाणे फरक दाखविता येतील.

१. नागरिक-लोकप्रतिनिधी ह्यांच्यामधले दळणवळण : सोपेपणा विशेष महत्त्वाचा, नेमकेपणा हळूहळू येईल अशी आशा.

२. नागरिक-प्रशासक ह्यांच्यामधले दळणवळण : प्रशासकांकडून नागरिकांपर्यन्त जाणारा मजकूर सोपा आणि काटेकोर दोन्ही हवा. काटेकोरपणा नसल्यास गैरसमज होऊन दिशाभूल केल्याबद्दलची तक्रार नागरिकांकडून येते.

३. लोकप्रतिनिधी-प्रशासक ह्यांच्यामधले दळणवळण : याचे स्वरूप बऱ्याच अंशी (२) प्रमाणेच राहील.

४. प्रशासक-प्रशासक ह्यांच्यामधले दळणवळण : याचे स्वरूप बरेच तांत्रिक स्वरुपाचे राहील. काटेकोरपणासाठी थोडा जडपणा पत्करावा लागेल.

५. नागरिक-वकील दळणवळण : याचे स्वरूप बरेचसे (२) प्रमाणेच राहील.

६. वकील-न्यायाधीश दळणवळण : याचे स्वरूप काहीसे (४) प्रमाणे राहील.

७. लोकप्रतिनिधी-न्यायाधीश, वकील दळणवळण : कायदेकानूंची भाषा ही सर्वात तांत्रिक राहते, लोकप्रतिनिधी क्वचितच ती घडवतात, मात्र त्यांचा हेतू त्या भाषेत हरवणार नाही ह्याची खबरदारी घेणे महत्त्वाचे आहे.

परिभाषेच्या अखिल भारतीय एकरूपतेबद्दल बरेचसे बोलले गेले आहे. कायद्याच्या परिभाषेत म्हणजे ६ व ७ मध्ये अधिकात अधिक एकरूपता असावी ह्याबद्दल दुमत नसावे. इतरत्र एकरूपतेचा आग्रह थोड्या मर्यादेतच धरण्यात हशील आहे. पूर्वी एकाच हुद्द्याला तहसिलदार, मामलेदार, लंबरदार अशी विविध नावे प्रांतवार होती. ती जाऊन एकच नाव सर्व राज्यात आले तर ती सुधारणाच होईल. चुनाव, निवडणूक इत्यादी राज्यवार संज्ञांच्याबरोबर निर्वाचन ही दुय्यम संज्ञा म्हणून भारतीय एकरूपतेसाठी ठेवावी : उलट 'ॲरियर्स' साठी अखिल भारतीय संज्ञा असण्याची काही खास गरज दिसत नाही. 'थकबाकी' पुरे आहे. सरते-

शेवटी आणखी एक प्रस्ताव मांडून हा मुद्दा पुरा करतो. सामान्य नागरिकांसाठी लागणाऱ्या पारिभाषिक संज्ञांची संख्या (संदर्भ १, २, ५ यांचा इथे विचार आहे) मर्यादित आहे. शासन व्यवहार कोशामधल्या सुमारे तीस हजार संज्ञांपैकी अंदाजे चाळीस टक्के संज्ञा या वर्गात पडतात असे घटकाभर समजू. अशा संज्ञांचा एक लघुकोश वेगळा प्रसिद्ध करता यईल. मराठी-इंग्लिश सोप्या मराठीत सोदाहरण अर्थविवरण हा एक भाग आणि इंग्लिश-मराठी सूची हा दुसरा भाग असे त्याचे स्वरूप राहील. अर्थविवरण म्हणजे काटेकोर व्याख्या नव्हे हे उघड आहे.

परिभाषा हे राजभाषेचे एक अंग आहे हे मागे सांगितलेच आहे. त्या अंगाचा तिसऱ्या सूचनेत विचार करावयाचा आहे. पारिभाषिक शब्द घडविताना आणि निवडताना कोणत्या गोष्टी लक्षात घ्याव्या लागतील ? पहिली गोष्ट म्हणजे इथे भाषिक सोवळ्याची काडीमात्र गरज नाही. कोणतीही समिती न बसता ओघाओघान मराठीत क्रिकेटची परिभाषा तयार झाली आणि ती अ. ब. कोल्हटकर इत्यादींच्या प्रयत्नांमुळे रुजली. लेग, ऑफ हे इंग्रजी शब्द, बिनबाद हा फारशी शब्द, यष्टिरक्षक हा संस्कृत शब्द, पायचित हा देशी शब्द गुण्यागोविंदाने एकत्र नांदत आहेत. यष्टिरक्षक हा बोजड शब्द काढून दांडीराख्या म्हणावे अशी कुणी मागणी केल्याचे ऐकिवात नाही. फार काय गोलंदाज हा गंगाजमनी शब्द देखील रुळला आहे. जे क्रिकेटच्या परिभाषेत होते ते इतरत्र का होऊ नये ? दुसरी गोष्ट निरनिराळ्या स्रोतांमधून एकाच अर्थाचे शब्द आले तरी त्यांचा उपयोग असतो. 'भूमिती' हा गणिताचा भाग तर 'जमीनमोजणी' हा महसूलखात्याचा भाग. 'संसद', 'लोकसभा', 'राज्यसभा', 'विधान परिषद' आणि 'विधानसभा' ह्या सगळ्यांचा एकत्र उल्लेख करण्यासाठी 'कायदेमंडळ' हा शब्द उपयोगी पडेल. तिसरी गोष्ट सोपेपणाबद्दलची— ह्या संबंधात पुढील हिंदी म्हण सदैव मनात वागवावी : सीधी लकीर खींचना बहुत टेढा काम होता है। सोपेपणा म्हणजे केवळ जोडाक्षरांची मोजदाद नव्हे—'भाषा संचालनालय' ह्या जोडाक्षरविरहित शब्दांपेक्षा 'भाषा संचालन कार्यालय' हे उच्चारायला अधिक सोपे. प्रत्येक शब्द

परिचित असावा हा आग्रह रास्त नाही. तो परिचयसुलभ असला म्हणजे झाले. 'प्रसाधनकक्ष' बऱ्यापैकी परिचयसुलभ आहे. पण तो मुतारीला वापरणे अन्वर्थक नाही. 'टॉयलेट' शब्दाचे ते अडाणी भाषांतर आहे. इंग्रजी शब्द पुष्कळदा इंग्रजी न जाणणारालासुद्धा परिचित असतो. पण तो त्याला खऱ्या अर्थाने कळतो असे नाही. शेतकऱ्याला 'सीडफार्म' शब्द कळतो असे म्हणणे म्हणजे गणिताची रीत न कळता अनुमान धपक्याने बरोबर उत्तर मांडणाऱ्या विद्यार्थ्याला गणित कळले म्हणण्यासारखेच आहे. ही दोन्ही विधाने दिशाभूल करणारी आहेत. सोपेपणासाठी नेमकेपणाला बळी देऊन चालणार नाही. 'कल्व्हर्ट'साठी 'अध:प्रणाल' हा शब्द बोजड म्हणून जसा योग्य नाही तसाच हिंदी परिभाषा कोशातला 'पुलिया' शब्दही सोपा असूनही योग्य नाही. 'कल्व्हर्ट' हा गाडीचा मार्ग नसून पाण्याचा मार्ग आहे. 'भुयारी गटार' हा त्याला योग्य प्रतिशब्द ठरू शकेल. 'सुईण' ऐवजी 'प्रसविका' शब्द दुर्बोध वाटतो हे खरे आहे, पण तो सुचवण्यामागे 'प्रसूति' आणि 'सूतिका' ह्या परिचित शब्दांशी अनुसंधान ठेवून तो निराळ्या दिशेने सोपा करण्याची दृष्टी असू शकेल. 'सोपा' हा शब्द 'क्वेश्चन बेगिंग' आहे. जे सिद्ध करायचे ते गृहीत धरून तो मोकळा होतो.

सरतेशेवटी सूचना करायची ती टीकाविषय बनलेल्या 'शासन व्यवहार कोशा'बद्दल. त्या कोशाची २० पाने, म्हणजे सुमारे ३० हजार शब्दांपैकी १ हजार शब्द, मी तपासले. त्यापैकी सुमारे एक टक्का संज्ञा अशा निघाल्या की त्यांना एक दुर्बोध आणि एक सुबोध पर्याय ठेवलेला आहे.

शासन, सरकार

वरकड खर्च, उपरिव्यय

शिवाय तीन टक्के संज्ञा अशा निघाल्या की त्यांना अधिक योग्य प्रतिशब्द मिळणे शक्य आहे.

अवेक्षक

अंशकालिक

अनुग्रहोत्तीर्ण

म्हणजे सुमारे तीनशे अधिक नऊशे शब्दांपायी हा कोश बदनामकोश झाला आहे. आणि असे होणे स्वाभाविक आहे. भात खाताना लागलेले खडे लक्षात राहतात, पोटात गेलेल्या शितांची कोणी मोजदाद करीत नाही. शिवाय ह्या तीन टक्के शब्दांपैकी काही शब्द वारंवार वापरले जाणारे असल्यामुळे त्यांची भाषाप्रदूषण करण्याची शक्ती तुलनेने जास्त असणार हेही विसरून चालणार नाही.

तर शासनाने म्हणजे सरकारने हा प्रश्न चांगल्या अर्थाने प्रतिष्ठेचा करावा आणि तपासणी समिती नेमून 'शासन व्यवहार कोशा'ची एक सुधारित म्हणजे सुधारलेली आवृत्ती काढावी आणि त्याची बदनामी थांबवावी. यशवंतराव चव्हाणांना एकदा प्र. के. अत्रे म्हणाले (लोकराज्य १-१०-१९७९) की तुमचे काम तुम्ही करा, टीका करण्याचे काम आम्ही करतो, आणि एक दिवस अधिक सोपे शब्द सापडतीलही.

इत्यलम्.

## राजभाषा मराठी संदर्भसूची


(१) राजभाषेसाठी कोशः :

हणमंते, रघुनाथ नारायण : राज्यव्यवहार कोश.

महाराष्ट्र शासन, भाषा संचालनालय : पदनामकोश

प्रशासन वाक्प्रयोग मुंबई : भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, १९६८ (प्रस्तावना १५-१०-१९६४) इंग्रजी-मराठी (१) १५३, मराठी-इंग्रजी (१६७–३१४).

शासन व्यवहार कोश मुंबई : भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन १९७३ (इंग्रजी-मराठी १–६१४).

(२) विवेचन.

अत्रे, प्र. के. : बदनामकोश— (मराठा)

कालेलकर, ना. गो. : नवमराठीची निर्मिती. महाराष्ट्र टाइम्स रविवार १३-५-१९७९, २०-५-१९७९.

कानिटकर य. शं. : भाषा व शब्दसाधना, लोकराज्य १-१०-१९७९.

गडकरी, माधव 'मराठा' सरकारचे 'ब्राह्मणी' मराठी. मुंबई रविवार सकाळ ६-५-१९७९ प्रतिक्रिया कानिटकर, य.शं. १०-६-१९७९. (उत्तर २४-६-१९७९) देशपांडे, स. ह. १०-६-१९७९; १७-६-१९७९. (उत्तर १-७-१९७९, ८-७-१९७९).

गवांदे, राजाभाऊ न्यायव्यवहारात मराठीचा वापर. लोकराज्य १-१०-१९७९.

गुप्ते, रा. भा. सर्वांना समजणारी परिभाषा हवी. रविवार सकाळ, पुणे २७-५-१९७९.

चंद्रचूड, म. वि. (भाषण) लोकराज्य १-१०-१९७९.

चव्हाण, यशवंतराव (भाषण) लोकराज्य १-१०-१९७९.

तळवलकर, गोविंद संपादकीय. महाराष्ट्र टाइम्स, ३०-३-१९७९, ६-६-१९७९.

धर्माधिकारी, चंद्रशेखर न्यायालयीन व्यवहार व मराठी भाषा, लोकराज्य, १-१०-१९७९.

देशपांडे, पु. ल. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, ८० वा वाढदिवस, भाषण.

देशमुख, बा. न. (भाषण) लोकराज्य १-१०-१९७९.

परिसंवाद वृत्तांत, महाराष्ट्र टाइम्स, ५-६-१९७९.

परांडेकर, शं. आ. परिभाषा आणि क्लिष्टता, रविवार सकाळ ३-६-१९७९.

पवार, शरच्चंद्र (भाषण), लोकराज्य १-१०-१९७९.

पाटील, राजारामबापू (भाषण), लोकराज्य १-१०-१९७९.

महाराष्ट्र शासन भाषा संचालनालय, शासन व्यवहारात मराठी— समस्या, स्वरूप, प्रक्रिया. मुंबई : भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, १९६४.

मुणगेकर, श्री. ग. (संपादकीय) रविवार सकाळ पुणे १७-१२-१९७८, १३-५-१९७९.

रेगे, मे. पुं. (संपादकीय). नवभारत ऑगस्ट १९७९.

प्रतिक्रिया देशपांडे, पु. ल. सप्टेंबर १९७९—उत्तर : सप्टेंबर १९७९.

वर्दे, सदानंद 'लोकराज्य' १-१०-१९७९.

वैद्य, भाई 'लोकराज्य' १-१०-१९७९.
संपादकीय, मराठा १८-२-१९६५.
संपादकीय, महाराष्ट्र टाइम्स २५-२-१९६५.
संपादकीय, लोकसत्ता २५-२-१९६५.
क्षीरसागर, श्री. के. हरवले आहे : मराठीचे मराठीपण, महाराष्ट्र टाइम्स रविवार ६-५-१९७९.

# सामाजिक अभिसरण व मराठी

**भाषा** हे सामाजिक अभिसरणाचे महत्त्वाचे घटकरूप आहे. समाजात वेगवेगळ्या व्यक्ती व व्यक्तीसमूह सतत आपापल्या संस्कृतीचे आविष्करण घडवीत असतात, ते आपापल्या भाषामाध्यमातून. नुसत्या महाराष्ट्राचा विचार केला तरी विविध भाषा बोलणारे अनेक व्यक्ती-समूह आहेत. हे व्यक्तीसमूह कधी प्रमाणभाषेचा, कधी प्रादेशिक भाषेचा तर कधी पारंपारिक भाषेचा अभिमान बाळगून स्वतःच्या भाषेव्यतिरिक्त इतर भाषांसंबंधी कधी द्वेष, कधी तुच्छता तर कधी असहिष्णुता व्यक्त करीत राहतात. असाच प्रकार भिन्न भिन्न जातींच्या संदर्भातही संभवतो. एकच भाषा परंतु भिन्न भिन्न जातींनी वापरलेली व उच्चारलेली भाषा माणसांचे गट निर्माण करते. भाषा पुष्कळदा सामाजिक असंतुलन राखण्यास मदतही करते. सामाजिक अभिसरणाच्या मार्गातील भाषाही कैकदा अडसर ठरते ती यामुळेच.

मराठी भाषेचा सार्थ अभिमान बाळगणारी माणसे सर्वच स्तरांत सापडतील. पैजेत अमृतालाही जिंकणारी अशी एकीकडे अतिरिक्त भावना तर आम्ही मराठी भाषेचे शिवाजी आहोत, अशी आंग्ल भाषेत मिर-वण्याची प्रवृत्ती दुसऱ्या टोकाची. मराठी माझी मातृभाषा आहे याचा

मला नेहमीच गर्व वाटतो. पण राष्ट्राचा विचार करताना 'हिंदी ही सामाजिक दळणवळणासाठी अधिक उपयुक्त भाषा आहे' असे उद्‌गार काढणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकरही आपल्याला विचारप्रवृत्त करतात. समाजाच्या वेगवेगळ्या स्तरांत बोलल्या जाणाऱ्या एकाच भाषेसंबंधाने जेव्हा 'हा ब्राह्मणासारखा बोलतो', 'हे पानी-लोनीवाले', 'यांना नीट उच्चार करता येत नाही', 'आमच्या घराण्यात उत्तम मराठी बोलतात' असे उद्‌गार ऐकायला मिळतात तेव्हा, भाषा हे माध्यम सामाजिक सुसंवादासाठी किती महत्त्वाचे आहे, याचा प्रत्यय येतो. हे एक प्रकारचे सामाजिक युद्धच असते, भाषांचे हत्यार घेऊन जुंपलेले. सामाजिक युद्धे, देशांतर्गत होणाऱ्या राजकीय युद्धासारखी नसतात. पण ही सामाजिक युद्धे समाजाला काही कमी हानी पोचवीत नाहीत. अशी युद्धे शांततेवाचून व शांतता युद्धावाचून अशक्यच असतात.

**सामाजिक संवाद साधते ती भाषा**

ही सामाजिक युद्धे सतत चाललेली असतात. त्यामुळे एकीकडे संस्कृती, सभ्यता यांचा वारसा सांगण्याची पद्धत व अहंकार; तसेच आपली अस्मिता व वेगळेपण जपण्यात धन्यता मानीत सामाजिकदृष्टचा श्रेष्ठ असल्याचा दावा करण्याचा उघड प्रकार तर दुसरीकडे ही अशिष्ट भाषा, ही अमराठी, ही गांवढळ भाषा म्हणून हे लोकही तितकेच असंस्कृत असा प्रकार! या भाषिक विचारसरणी सामाजिक विचारसरणीच असतात. त्यामुळे 'प्रमाण भाषा', 'उत्तम मराठी', 'चांगली मराठी', 'सुसंस्कृत मराठी' असे शब्दप्रयोग कानावर आदळतात, ज्याचे स्पष्टीकरण करणे आवाक्या-बाहेरचे असते. प्रमाण भाषा, उत्तम मराठी असे शब्दप्रयोग आले की, स्वाभाविकच इतर अभिव्यक्ती अप्रमाण, हिणकस ठरविण्याचा प्रयत्न होतो. सामाजिक दळणवळणातील हा अडसर सामाजिक संवादाला नेहमीच बाधा आणीत असतो, हे विसरून चालणार नाही. भाषा व्यवहार हा सामाजिक मने सांधणारा महत्त्वाचा दुवा आहे, हे दुर्लक्षिले गेल्यामुळे समाजगटात, अलिप्ततेची व दुराव्याची भावना निर्माण होते व ती जोपा-

सलीही जाते. पुढे तर त्यात तीव्रताही निर्माण होण्याचा संभव असतो. समाजातील उच्च वर्गाची भाषा ही प्रमाण भाषा, सुसंस्कृत भाषा असा एक फसवा प्रचारही त्याला अनेकदा कारण ठरतो. याचा एक उलट परिणाम मी असा अनुभवला आहे की, अशिक्षित किंवा तथाकथित खालच्या जातीतील लोकांना आपण बोलतो त्या भाषेसंबंधी एक प्रकारचा अविश्वास वाटत असतो. आणि नंतर त्यांच्या मनात अकारण दुराव्याची, संकोचाची भावना बळावत जाते. भाषेसंबंधी 'सर्टिफिकेट' देण्याच्या प्रवृत्तीमुळे हा प्रकार घडत असतो, हे नाकारता येणार नाही. म्हणजे एकीकडे अहंगंड व दुसरीकडे न्यूनगंड अशी अवस्था एकच भाषा वापरणाऱ्या लोकांच्या संबंधाने निर्माण होताना दिसते. त्यामुळे भाषिक उद्दामपणा हा सांस्कृतिक उद्दामपणा ठरतो आणि भाषिक लाचारी ही सांस्कृतिक लाचारी ठरते. सवर्णीय पिता, आपल्या मुलाच्या अंगावरील मळकट कपडे पाहून जेव्हा 'कसा म्हारडयासारखा दिसतोस !' किंवा 'फाजील चांभारचौकशा करू नकोस' म्हणून दरडावणारा प्रेमळ पिता आपल्या उच्च जातीय भावनांचेच प्रदर्शन करीत असतो. एखादा महार जातीतील लेखक ग्रांथिक भाषा बोलू लागला की, 'कसा बामनासारखा बोलतो' असे व्यक्त झालेले मत कुठेतरी अपुरेपणाची बोचच प्रदर्शित करीत असते. मांग, बेरड या जातीसंबंधानेही असेच शब्दप्रयोग सहजतेने वापरले जातात. तुच्छता, उपहास किंवा अहंकार, उद्दामपणा ही भाषा-व्यवहाराची सहजमाध्यमे आपल्या समाजात अंगवळणी पडलेली दिसतात. त्यामुळे एका समाजगटाचे सामाजिक तथाकथित 'उच्चत्व' आणि इतर समाजासंबंधीची 'हीन'त्वाची भावना सामाजिक असंतुलनाचे पोषण करते, याचे आजही भान राखण्याची गरज आहे. साहित्य, बोलपट, अभ्यासक्रमाची पुस्तके, नभोवाणी किंवा दूरदर्शन यासारख्या लोकजीवनाशी सतत संबंध असणाऱ्या माध्यमांचाही गंभीरपणे विचार करण्याची गरज आहे. कारण ही माध्यमे सामाजिक तणाव, अलिप्तता, दुरावा निर्माण करूही शकतात वा नष्टही करू शकतात.

**वृत्तपत्रांची भूमिका**

या संदर्भात आणखी एक महत्त्वाचे माध्यम म्हणजे वृत्तपत्र. Gunnar Myrdal या विख्यात विचारवंताने वृत्तपत्रासंबंधी एक अत्यंत महत्त्वाचे विधान केले आहे. 'The press is also the chief agency of group control' (An American Dilemma p. 911). आज बहुसंख्य वृत्तपत्रे दलितेतरांची आहेत. दलितांची वृत्तपत्रे ही नेहमीच वळवाच्या पावसासारखी राहिलेली आहेत. या वृत्तपत्रांची फारशी प्रतिमाही निर्माण होऊ शकली नाही. त्यामुळे या वृत्तपत्रांची फारशी दखलही घेतली जात नाही. परंतु दलितेतरांची सर्वच वृत्तपत्रे दलितांच्या बाजूने आहेत असे म्हणणे हास्यास्पद ठरेल. बहुसंख्य वृत्तपत्रे दलितविरोधी कशी आहेत हे वेगवेगळ्या आंदोलनांच्या वेळी प्रत्ययाला आल्याशिवाय राहिले नाही. मराठवाड्यात नामांतराच्या निमित्ताने जो उद्रेक झाला, त्यावेळी या भागातील काही वृत्तपत्रांनी, दलितांचे भीषण शिरकाण चालले असताही, त्यासंबंधी सौम्य धोरण आखलेले होते. त्यासंबंधी बातम्या देण्याचेही टाळले होते. परंतु एखाद्या दलितेतराच्या घरावर कुणी एखादा दगड फेकला की, त्यासंबंधीचे ठळक मथळे देऊन, यामागे दलितशक्ती उभी आहे, असे भासविण्याचा प्रयत्न केला. दलितविरोधी भूमिका घेतल्याने सबंध समाजातच तेढ निर्माण होत जाणे आणि त्यामुळे अलगतेची, तुटकपणाची भावना तीव्र होणे स्वाभाविक असते. मराठी वृत्तपत्रांनी समाजातील असुरक्षिततेच्या भावनांना गोंजारणे नैतिकदृष्टीने कितपत बरोबर आहे? पुष्कळदा मूळ प्रश्न बाजूला राहून अस्थिरता निर्माण होण्यात त्याचे पर्यवसान होते. सामाजिक अभिसरणाच्या नीतीशास्त्राची चिरंतन मूल्ये, स्वातंत्र्य, समता, बंधुता आणि न्याय ही जर आपण मान्य केली तरच सामाजिक स्वास्थ्याचा विचार केल्यासारखे होईल. वृत्तपत्रे या विचारांचे निश्चितपणे सारथ्य करू शकतील असे वातावरण निर्माण होण्याची गरज आहे. मराठी भाषा ही लोकभाषा असेल तर सामाजिक अभिसरणाच्या महायात्रेत तिने अंगावरची खोट्या प्रतिष्ठेची झूल झुगारून दिली पाहिजे. ज्या ज्या

साधनांच्या माध्यमातून ती व्यक्त होते; ती सर्व साधने पराभूत झालेली आहेत, याची जाणीव डोळसपणे जोपासल्याशिवाय सामाजिक अभिसरण, सामाजिक संवाद हे शब्द केवळ कोशातच राहतील.

# लोकव्यवहाराची विविध क्षेत्रे व मराठी गद्यशैलीचा विकास

सुसंस्कृत समाजात भाषेची बोली व लिखित अशी दोन्ही स्वरूपे अस्तित्वात असतात. लिखित भाषेत पद्य आणि गद्य अशा दोन प्रवृत्ती आशयाच्या गरजेनुरूप वापरलेल्या असतात. गद्याची परंपरा सर्व जगभर उशीरा सुरू झाली तरी आज तिने लिखित भाषेचे जवळजवळ सर्वच क्षेत्र व्यापलेले दिसते. कारण गद्य हे माध्यम बुद्धिनिष्ठ, सारासार विचाराला पोषक आणि लवचिक आहे. त्यातून मध्ययुगीन आत्यंतिक व्यक्तिवादाची जागा सामाजिकतेच्या लोकशाही जाणीवेने घेतल्यामुळे गद्याला आज दुसरा पर्याय नाही. शास्त्रीय विचारापासून तर कादंबरीपर्यंत गद्याच्या विविध शैली आज सर्व प्रगत भाषांमध्ये रूढ झाल्या आहेत. बहुतेक सर्व लोकव्यवहाराच्या क्षेत्रांत गद्य वापरलेले दिसून येते. समाजजीवनातील सांस्कृतिक मूल्यांचे जतन, संवर्धन आणि वहन करण्याची जबाबदारी आज प्रामुख्याने गद्यावर आहे. म्हणून मातृभाषेच्या लिखित स्वरूपाचा विकास करणे, सर्व व्यवहारात मातृभाषा वापरणे ही नैसर्गिक क्रिया सर्व जगभरच्या स्वतंत्र मानवी समूहांमध्ये निरपवाद दिसून येते.

आधुनिक मराठी गद्यशैली इंग्रजी संस्कृतीच्या हिंदू संस्कृतीशी एकोणिसाव्या शतकात झालेल्या संपर्कातून विकसित झाल्याचे दिसते. त्याआधी तेराव्या शतकात व नंतर शिवकालानंतर मराठीत समर्थ गद्य-लेखन होते. एकोणिसाव्या शतकातही १८५७ पर्यंत ईस्ट इंडिया कंपनीच्या काळात देशी भाषांतूनच व्यवहार व्हावेत असा इंग्रजांचा कटाक्ष होता. १८५७ नंतर इंग्रज सरकार देशी भाषांबाबत उदासीन झाले आणि शिक्षणक्षेत्रात घुसलेल्या स्वार्थी लोकांनी इंग्रजीचा ठेका घेतला तो आज-पर्यंत सोडलेला नाही. इंग्रजी टिकवण्यामागे आजही ह्या वसाहतवादी, साम्राज्यवादी प्रवृत्ती आहेत, फरक एवढाच की ह्या प्रवृत्ती इंग्रजांऐवजी आता मूठभर असलेले नोकरमाने शहरी-उपरे, परप्रांतीय आणि कारकुनी वृत्तीचे लोक टिकवीत आहेत. ह्यात एक मोठे सांस्कृतिक अध:पतन राज-रोसपणे चाललेले दिसते. लहानपणीच कोवळ्या लेकरांना इंग्रजी माध्य-माच्या शाळांमध्ये घालून त्यांना बौद्धिक पंगुत्व आणण्याची ही क्रिया कोणत्याही मानवी मूल्यांना धरून नाही. इंग्रजीच्या या समाजातल्या अस्तित्वानेच आपल्या लोकांच्या उपजत कल्पनाशक्तीचा नाश होत आला आहे. युनेस्कोने सर्व स्वतंत्र राष्ट्रांना पाठवलेल्या खलित्यात शिक्षण मातृ-भाषेतूनच दिले जावे असे कळवलेले असूनही स्वार्थी, व्यापारी मनोवृत्तीचे लोक इंग्रजी टिकवून धरीत आहेत. परभाषा ह्या लायब्ररी लँग्वेज म्हणून आणि स्वभाषेला विचारांचा पुरवठा करणाऱ्या म्हणून शिकवल्या जाव्यात हे धोरण जोपर्यंत आपल्या सरकारला आणि लोकांना मान्य होत नाही तोपर्यंत मातृभाषेच्या विकासाची दुर्दशा थांबणे अशक्य आहे.

भाषा म्हणजे काय आणि भाषा समाजाच्या विविध क्षेत्रांत कशी वापरली जाते याचे शास्त्रीय आकलन न झाल्यामुळे आपल्या सुशिक्षितांची लिखित भाषेकडे पाहण्याची दृष्टी संकुचित राहिली आहे. भाषेचा अभ्यास आपल्या विद्यापीठातून किती अडाणी पद्धतीने चालतो हे भाषांचे सर्व विद्यापीठातले अभ्यासक्रम पाहणाऱ्यांच्या लक्षात येईल. शिक्षणक्षेत्रातले हे सुशिक्षितांचे अज्ञान दूर केल्याशिवाय मराठीच्या विकासाला गती येणे

अशक्य आहे. अशा सुशिक्षितांकडून मराठीचा व पर्यायाने ह्या देशातील संस्कृतीचा विकास होईल अशी आशा नाही.

भाषेच्या वापरात वैयक्तिक व सामूहिक अशी दोन अंगे स्पष्टपणे वेगळी असतात. सबंध मराठी समाजाची भाषा ही प्रत्येक व्यक्तीने वापरावी अशी अपेक्षा नसते. गरजेप्रमाणे आपापल्या क्षेत्रातली भाषा नीट येणे हीच किमान अपेक्षा असते. नानाविध उद्योगधंदे, अपरिचित प्रगत शास्त्रे, कला, समाजातील नानाविध क्षेत्रे ह्या सर्वांमध्ये वापरली जाणारी मराठी भाषा प्रत्येक व्यक्तीला परिचित असेलच असे नाही. ती तशी असू नये. व्यक्तीने प्रत्येक क्षेत्रातली भाषा आपल्याला विनासायास समजेल अशी अपेक्षा करणे हा दुराग्रह आहे. विशिष्ट क्षेत्रातली तांत्रिक परिभाषा बुद्धीला शीण दिल्याशिवाय समजावी अशी अपेक्षा निर्बुद्ध माणसेच करतात. ह्यात नवीन काही न शिकण्याची आळशी वृत्तीच प्रकट होत असते.

बोली व लिखित शैलीचे परस्परसंबंध कसे असावेत हाही एक वादग्रस्त प्रश्न झाला आहे. ह्या दोन्हींमध्ये फारसे अंतर असू नये हे मान्य केले तरी ह्यात काहीच अंतर असू नये, बोलीभाषेतूनच लिखित भाषा घ्यावी असे म्हणणे म्हणजे विकास थांबवणे होय. लिखित भाषेमुळे बोलीभाषेची समृद्धी वाढते हे तुकारामाचा मराठीवर झालेला परिणाम पाहता लगेच लक्षात येईल. भाषेच्या अनेक वापरांना त्यामुळे मर्यादा बसेल. नेहमीच्या संभाषणातली भाषा आधी सोपी करण्याचे सुशिक्षित मराठी लोकांनी मनावर घेणे आवश्यक आहे. मायबाप, नवरा-बायको हे देशी शब्द उच्च स्टेटस दर्शविणारे सुशिक्षित लोक बोलण्यात वापरत नाहीत. 'ही माझी बायको' ऐवजी 'ही माझी पत्नी', 'हा माझा नवरा' ऐवजी 'हे आमचे यजमान' असे संभाषणात बोलणाऱ्या सुशिक्षितांनी लिखित भाषेकडून देशी सोपेपणाची अपेक्षा करणे हे ढोंग आहे.

समाजातल्या विविध क्षेत्रांत त्या त्या क्षेत्राला शोभणारी अशी शैली वापरली जाते. कीर्तनातली हरदासी भाषा, शाळा-कॉलेजात शिकवताना वापरल्या जाणाऱ्या भाषेपेक्षा वेगळी असते. गंभीर विषयांवरच्या पुस्त-

कातील भाषा कादंबरी-नाटकातल्या भाषेपेक्षा वेगळी असावी लागते. साहित्यातसुद्धा कवितेची भाषा निबंधाच्या भाषेपेक्षा वेगळी पडते. वर्तमानपत्रातली भाषा जाहिरातीतल्या भाषेपेक्षा वेगळी असते. कायद्याची भाषा राजकीय व्यासपीठावरील भाषेपेक्षा वेगळी असते. असा लोक-व्यवहारातील विविध शैलींचा विस्तृत पट मांडता येतो. ह्या विविधतेत एकमेकांपासून वेगळे असण्यात भाषेची समृद्धी असते. परिभाषेची शास्त्रीय काटेकोर भाषा नेहमीच्या बोलीभाषेपासून संपूर्णतः निराळी असणे आवश्यक असते. लोकव्यवहाराच्या प्रत्येक क्षेत्रात वापरली जाणारी भाषा वैशिष्टचपूर्ण असावीच लागते.

व्यवहारात आजपर्यंत वापरल्या गेलेल्या इंग्रजी शब्दांना परिभाषा शोधताना वरील तत्त्वांचा उपयोग होईल. परिभाषेचे कार्य एका बाजूने निश्चित अर्थ देणे तर दुसऱ्या बाजूने संबंधित शब्दांचे वर्ग सूचित करणे असे असते. परिभाषेत ही शिस्त आवश्यक असते. ही तत्त्वे मान्य केल्याशिवाय परिभाषा करताच येत नाही. ह्या बाबतीत मराठीत नेहमी शुष्क चर्चा चालल्याचे आढळून येते. हे शब्द सर्वसामान्यांना समजणारे, बोलीभाषेतले, सुलभ असावे असा प्रतिसिद्धांत मांडण्यात येतो.

ह्या बाबतीत एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, परिभाषेतली ही वादस्थळे फक्त शब्दांपुरतीच मर्यादित असतात. वाक्यरचना, वाक्यांश-रचना ही मराठीच्या तत्त्वांनीच केली गेली पाहिजे कारण मराठी यासाठी समर्थ आहे. व्यवहारातल्या फार थोडचा शब्दांपुरताच हा वाद उरतो. इंग्रजी शब्दांची सवय झालेल्या एका पिढीला हे नवे शब्द कर्कश वाटणे साहजिक आहे. परंतु आज **अर्थसंकल्प, कर्मचारी, कार्यक्रम, पटकथा, दिग्दर्शक, निर्माता, पत्रव्यवहार, पार्श्वभूमी, विद्यापीठ, लोकसभा** इत्यादी हजारो शब्द एका पिढीतच रूढ झालेले आपण पाहिले. ह्यातला रघुवीरी प्राणायाम काही शब्दांपुरता टाकावू वाटला तरी तांत्रिक परिभाषा रूढ करायला दुसरा पर्याय नाही. काही इंग्रजी शब्द संस्कृत शब्दांपेक्षा सोपे, सर्वांना कळणारे असतात. उदाहरणे देऊन विनोद, हंशा पिकविणारे अडाणी विचारवंतही आपल्या समाजात फार आहेत. ह्या लोकांना

स्वभाषेचे प्राथमिक महत्त्वही माहीत नसते. अखेर भाषा ही प्रतीकात्मक असते. ध्वनीची प्रतीके व अर्थ यांच्यात अर्थाअर्थी संबंध नसतो. इंग्रजी म्हटले जाणारे हे शब्दही मुळात बव्हंशी लॅटीनमधून व काही अंशी ग्रीक व इतर आधुनिक युरोपीय भाषांमधून घेतलेले आहेत. तितकीच लवचिक धातुक्रिया असलेली संस्कृतची शब्दसंपत्ती ह्यासाठी वापरून घेणे सर्व दृष्टींनी समर्थनीय आहे. शिवाय संस्कृत ही केवळ ब्राह्मणी भाषा नसून जगातली एक संपन्न भाषा समजली जाते. संस्कृतमधून अत्यंत उत्तुंग शास्त्रीय विचार व्यक्त झालेले आहेत. एवढेच नव्हे तर ती ह्या देशाची lingua franca होती. संस्कृतची कास धरल्याशिवाय ह्या क्षेत्रात आपल्याला पुढे जाता येईल असे वाटत नाही. संस्कृत ही सर्व हिंदुस्थानातील भाषांना कवटाळणारी एक Paigin संयुक्त भाषा होती हेही लक्षात घेतले पाहिजे. उर्दू-पर्शियन ह्या भाषाही संस्कृतशी रक्ताचे नाते सांगणाऱ्या आहेत हे बहुतेक हिंदुत्ववाद्यांना माहीत नसावे. मात्र संस्कृतमधून शब्द घेताना मराठीच्या ध्वनिप्रक्रियेशी जुळणारी शब्दावली घेणे आवश्यक आहे. हा विवेक तज्ज्ञांनी जागृत नेहमी ठेवला पाहिजे.

विविध लोकव्यवहारात भाषा वापरत राहिल्याने भाषा सशक्त होते. ही भाषा बोलणारे लोक सर्जुक पद्धतीने ती वापरू शकतात. जंगलखात्याच्या रिपोर्टापासून तर पी. डब्ल्यू. डी. मधील रोड कारकुनाच्या रिपोर्टापर्यंत सर्व व्यवहार मातृभाषेतून झाले तर भाषेची लवचिकता वाढते, कार्यशक्ती वाढते. इंडियन इंग्रजीत अनाकलनीय पत्रव्यवहार करणाऱ्या आणि पोपटासारखी चुकीची इंग्रजी बोलणाऱ्या अनेक पिढ्यांनी ह्या देशाच्या संस्कृतीत इंचभरही भर घातलेली नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

नेहमीच्या बोलीतले शब्द परिभाषेत वापरा हे तत्त्व म्हणून कितपत टिकेल याची खात्री देता येत नाही. कोणत्या बोलीतले शब्द वापरावे हा प्रश्न येथे उपस्थित होईल. पुण्या-मुंबईच्या लोकांना जवळचा वाटणारा 'कोंबडा' असा शब्द महाराष्ट्रातल्या सर्व भागात जवळचा वाटणार नाही. वऱ्हाड-खानदेशात व इतरत्रही अनेक जमातीत 'भुरगा' हा शब्द

जवळचा आहे. तो का वापरू नये ? हे भांडण उपस्थित करण्यापेक्षा 'कुक्कुट' हा संस्कृत शब्द जास्त चांगला. कारण ह्यामुळे मराठीत आणखी एक शब्द येतो. त्या शब्दाची वेगळी दृष्टी अर्थव्यवहारात येते. गद्यशैलीची समृद्धी वाढते. **'लोहमार्ग'** हा शब्द **'लोहार'**, **'भक्तिमार्ग'** हे शब्द माहीत असलेल्या ग्रामीण जनतेला जास्त जवळचा आहे. तो संस्कृत म्हणून कठीण आहे ही ओरड चुकीची आहे. मार्ग, रस्ता, पथ, रोड हे सगळेच शब्द भाषेला विविध छटा आणून देतात. म्हणून बोलीचा दुराग्रह परिभाषेत असता कामा नये. समाजात लांबलांबचे अनेक मोठे समूह सोशिकपणे प्रमाणभाषेची शिरजोरी सहन करत असतात, याचे भानही प्रमाणभाषाच ज्यांची बोलीभाषा आहे अशा शहरी समूहांनी ठेवले पाहिजे. पुण्या-मुंबईच्या लोकांना जे शब्द जवळचे, सोपे वाटतील ते कोकणी-खानदेशी-वऱ्हाडी-मराठवाड्यातल्या लोकांना जवळचे वाटतीलच असे नाही. म्हणून परिभाषेत तज्ज्ञांची मते जास्त ग्राह्य धरली पाहिजेत. दुर्दैवाने परिभाषा रुळवण्यात आपले सरकार, जुनेच ड्राफ्टींग करणारा आळशी कारकूनवर्ग आणि विद्यापीठामधील इंग्रजीतून चोऱ्या करणारे विद्वान, स्वार्थी परप्रांतीय नोकरमाने लोक, उदासीन राहिल्यामुळे विकासाची गती मंद आहे. ह्या तिन्ही वर्गांवर सुबुद्ध नागरिकांनी कडक नजर ठेवणे आवश्यक आहे.

लिखित गद्यशैलीचा आणखी एक पैलू म्हणजे तिचे दृश्य स्वरूप. बऱ्याचदा व्यवहारातल्या शब्दांना, शब्दसमूहांना प्रतीकांपलीकडे दुसरे कार्य नसते. बऱ्याचदा त्यांचे दृश्य स्वरूपच अर्थ व्यक्त करते. अक्षरांचा आकार चित्रासारखा अर्थ व्यक्त करतो. CIDCO सिडको म्हणजे काय हे माहीत नसले तरी त्याचा short form कळतो. मराठीची देवनागरी लिपी ह्या दिशेने विकसित करणे आवश्यक आहे. ह्यात संशोधनाला सुरुवातही झालेली नाही, ही खेदाची गोष्ट आहे. अलीकडच्या मराठी टायपांचे, हस्तलिपीचे दारिद्र्य लक्षात घेण्यासारखे आहे. निर्णयसागर, कर्नाटक ह्या फौंड्र्यात ओतलेले सुंदर मराठी टाईप जाऊन आता ओंगळ टाईप सर्रास चाललेले दिसतात. देवनागरीचे वळणही ओंगळ

झालेले आहे. आद्याक्षरांची प्रतीके करण्याची शक्ती देवनागरी लिपील देण्याचे प्रयत्न करणे आवश्यक आहे. ध्वनी, अक्षरे व अर्थ यांचे नवनवे अंतरंग शोधणे आवश्यक आहे.

# मराठी माध्यमाद्वारे सामाजिक अभिसरण

**सा**माजिक अभिसरणाचा विचार करताना प्रथम सामाजिक स्तरीकरणाची संकल्पना स्पष्ट करावी लागेल. जगातल्या प्रत्येक समाजात स्तरीकरण असते, म्हणजेच विषम स्वरूपाचे थर असतात. मालमत्ता, दर्जा व सत्ता हे या स्तरीकरणाचे आधारही सर्वत्रच असतात. व्यक्तींवर आणि राष्ट्रांच्या सामाजिक इतिहासावर स्तरीकरणाचा जेवढा परिणाम होत असतो तेवढा तो अन्य कोणत्याच एकेका घटकाचा होऊ शकत नाही. स्तरीकरण सार्वत्रिक असले तरी सर्वत्र सारख्याच स्वरूपाचे मात्र असत नाही. काही समाजातील स्तरीकरणाचे स्वरूप ताठर आणि पाणीबंद असते. अशा समाजात व्यक्तीच्या संपादित दर्जापेक्षा जन्मसिद्ध दर्जालाच मान्यता असते. तिने आयुष्यात कितीही भरभराट करून घेतली तरी सामाजिक स्तरीकरणाच्या उतरंडीतील तिचे स्थान जन्मतः होते तिथेच राहते. काही समाजांमध्ये मात्र व्यक्तीच्या यशापयशानुरूप हे स्थान बदलते. समाजरचनेच्या वरच्या पायरीवर चढणे वा खालच्या पायरीवर घसरणे व्यक्तीबाबत घडत असते. खाली-वर होणाऱ्या या दर्जांतराचा

संदर्भ सामाजिक अभिसरणाशी असतो. वरील दोन उदाहरणांपैकी भारतीय समाजाचे चित्र हे पहिल्या प्रकारच्या समाजाशी जुळते.त्यामुळेच डॉ. आंबेडकरांनी या समाजाची तुलना जिना नसलेल्या अनेक मजली प्रासादाशी केली होती. समाजशास्त्रात अभिसरणाचे दोन ठळक प्रकार सांगितले जातात : आडवे अभिसरण आणि उभे अभिसरण. जिथे व्यक्तीच्या आर्थिक-राजकीय वगैरे अवस्थांतरानंतरसुद्धा तिचा दर्जा खालावत वा उंचावत नाही तिथल्या अभिसरणाला आडवे अभिसरण असे म्हणतात तर व्यक्तीच्या अवस्थांतराबरोबरच तिचे स्पष्ट दर्जांतरही घडवून आणणाऱ्या अभिसरणास उभे अभिसरण असे नाव दिले जाते. सामाजिक परिवर्तनाच्या व एकजिनसीपणाच्या दृष्टीने उभे अभिसरण घडून येणे अधिक महत्त्वाचे असते. आपल्या देशात आडवे अभिसरण कमीअधिक प्रमाणात घडून येत असले तरी उभे अभिसरण मात्र फारसे झाल्याचे आढळत नाही.

व्यक्ती आणि समूह यांचे सतत सामाजिक स्थित्यंतर होत जाणे आणि सांस्कृतिक ध्येये, मूल्ये व गुणलक्षणे यांचे समाजातल्या थरांमध्ये अखंड आदानप्रदान होत राहाणे हे सामाजिक अभिसरणाचे व्यवच्छेदक लक्षण असते. या दृष्टीने भारतीय इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास काय दिसते? येथील समाजात संस्कृतीचा मक्ता पूर्वापार विशिष्ट सामाजिक स्तरांकडेच राहिला असून सामाजिक अभिसरणाची गती कायम संथच राहिली आहे. विशिष्ट स्तराला धर्म, अर्थ, शिक्षण, साहित्य, कला, विज्ञान वगैरे क्षेत्रांत मुक्त संचारस्वातंत्र्य असणे आणि इतर स्तरांना त्यात प्रत्यवाय असणे हे या देशात सतत घडत आले आहे. इथल्या प्राचीन वर्णव्यवस्थेने वेदाध्ययनाचा अधिकार फक्त त्रैवर्णिक पुरुषांनाच दिला होता. शूद्रांना व स्त्रियांना तो सपशेल नाकारला होता. इतिहासक्रमात त्रैवर्णिकांची कक्षा संकोचत जाऊन शूद्रातिशूद्रांची कक्षा विस्तारत गेली आणि अशी अवस्था आली की फक्त ब्राह्मणवर्णापुरताच वेदाधिकार मर्यादित झाला. शुचित्वाचा अतिरेकी सोवळेपणा व वर्णसंकराचे अनाठायी, अशास्त्रीय भय यामुळे हा समाज सदैव आतून दुभंगलेला असाच राहिला. संस्कृत विरुद्ध

प्राकृत हा संघर्ष सामाजिक स्तरीकरणाच्या जाचक स्वरूपातूनच उद्‌भवलेला दिसून येईल. पुढे वर्णव्यवस्थेची जागा जातीव्यवस्थेने घेतली तरी अभिसरणाची प्रक्रिया खोळंबलेलीच राहिली. प्राथमिक पातळी-वरील आदानप्रदान आणि सामाजिक आंतरक्रिया यावरचे निर्बंधही पूर्वीइतकेच कडक राहिले. मूठभरांची शिक्षणसाधनांवरची मक्तेदारी तशीच कायम टिकली. आज जातीय स्तरीकरणाची जागा वर्गीय स्तरी-करण घेत आहे हे खरे असले तरी त्यामुळे नवे चातुर्वर्ण्य निर्माण होणे थांबलेले नाही. संस्कृत-प्राकृत वादाच्या ऐवजी इंग्रजी-मराठी वाद आज होत आहे, आणि तोही नव्या स्तरीकरणाच्या व्यावर्तकतेचाच परिणाम आहे. आधुनिक काळाने उपलब्ध करून दिलेल्या संधी व सुविधा आपल्याच घशात जातील याचा व त्या जनसामान्यांना लाभू नयेत याचा खटाटोप आजचे बहुजातीय श्रेष्ठी आपल्या एकजातीय पूर्वसूरींइतक्याच हिरीरीने करीत आहेत.

अशा प्रकारे श्रेष्ठींची भाषा व जनसामान्यांची भाषा यांच्यातील विग्रह सतत टिकून राहणे हे भारतीय समाजव्यवस्थेचे सनातन वैशिष्ट्यच मानावे लागेल. या भाषिक विग्रहाचा दुष्परिणाम इथल्या शिक्षणप्रणाली-वर पडणेही त्यामुळे क्रमप्राप्तच ठरते. अल्पसंख्यांकांनाच ज्ञानाधिकार––पर्यायाने विकाससंधी––लाभणे आणि बहुसंख्यांकांना त्यास वंचित व्हावे लागणे हे निकोप समाजाचे लक्षण निश्चितच म्हणता येणार नाही. प्राचीन काळापासून आजपर्यंत अवरुद्ध सामाजिक अभिसरणाचा जो शाप या समाजाला लाभला आहे त्याच्या परिणामी तथाकथित भारतीय संस्कृती ही उच्चस्तरीयांचीच संस्कृती प्रत्यक्षात ठरली असून समाजातला फार मोठा घटक तिच्यापासून नेहमीच वंचित राहिला आहे. देशाचे सांस्कृतिक जीवन कप्पेबंद झाल्याची साक्ष इथे सर्वच आघाड्यांवर मिळते. एकेकाळी जागतिक संस्कृतींच्या बरोबरीने प्रतिष्ठा पावलेल्या भारतीय संस्कृतीची सद्य:स्थिती विलक्षण दयनीय आहे. ऱ्हासमार्गावरील संस्कृती (डिकेडन्ट कल्चर) असे तिचे सार्थ वर्णन आज केले जाते. तिची ही कुंठित, साचेबंद दुरवस्था जर दूर व्हायची असेल तर उपरोक्त शापाला उ:शाप दिला

जाणे नितांत अगत्याचे झाले आहे. सामाजिक अभिसरणाची वर्षानुवर्षे होत आलेली कोंडी फोडण्याचा विशेष प्रयत्न करण्याबाबत आजही आपण टाळाटाळ केली तर या पुरातन संस्कृतीचा डोलारा कोसळल्यावाचून राहणार नाही.

सामाजिक अभिसरणाला पोषक होणाऱ्या ज्या अनेक शक्ती सांगितल्या जातात त्यात आधुनिकीकरण, औद्योगीकरण व शहरीकरण यांच्या जोडीलाच शिक्षणाचाही अंतर्भाव केला जातो. किंबहुना असेही म्हणता येईल की, आधीच्या तीन शक्तींपेक्षाही शिक्षणाचे महत्त्व जास्त आहे कारण त्याचे कार्य अधिक मूलगामी स्वरूपाचे व अन्य त्रिशक्तींना जागवणारे-जोपासणारे असे आहे.

प्रत्येक समाज हा विशिष्ट मूल्यव्यवस्थेवर आधारित असतो आणि त्यामुळेच टिकून राहतो. ही मूल्यव्यवस्था व्यक्तीला उपजतच लाभत नसून शिकावी लागते. सांस्कृतिक मूल्यांचे संक्रमण करून सामाजिक वारसा सातत्यपूर्वक टिकवण्याचे कार्य शिक्षणातून घडत असते. जेव्हा समाज आपली काही जीर्ण व त्याज्य मूल्ये सोडून नव्या मूल्यांना शिरोधार्य मानण्याचा निर्णय घेतो तेव्हा या नवमूल्यांची रुजुवातही शिक्षणामार्फतच घडून येऊ शकते. विषमता, अंधश्रद्धा, गतानुगतित्व सोडून समता, स्वातंत्र्य, बुद्धिवाद, धर्मनिरपेक्षता व समाजवाद नव्याने स्वीकारणाऱ्या समाजातील शिक्षणपद्धतीवर हे विशेष उत्तरदायित्व आपोआपच येत असते. नव-मूल्यांच्या अनुसार नागरिकांची व्यक्तिमत्त्व तिला संस्कारित करायची असतात.

सामाजिक अभिसरणाच्या दृष्टीने एक महत्त्वाचे साधन म्हणून शिक्षण असते हे मान्य केल्यास त्या शिक्षणाचे स्वरूप आणि माध्यम यांचा विचार करणे अगत्याचे ठरते. प्रस्तुत निबंध केवळ माध्यमापुरताच विचार करीत असल्याने स्वरूपाबद्दलचे विवेचन त्याच्या कक्षेत येत नाही. शिक्षणाचे माध्यम असे असावे की जेणेकरून सर्वांसाठी शिक्षणाची समान संधी व गुणवत्तेनुसार समान शिक्षण उपलब्ध व्हावे, समनुयोगाच्या व समन्वीकरणाच्या सुधारित साधनांचे वैपुल्य होऊन त्यातून सामाजिक

अभिसरणास चालना मिळावी, शिक्षणाचे वर्गीय व व्यावर्तक स्वरूप नष्ट व्हावे. दुर्दैवाने आपल्या देशातील शैक्षणिक पर्यावरण हे वर्गीय व व्यावर्तक असून उच्च दर्जाचे तांत्रिक, वैज्ञानिक व व्यावसायिक शिक्षण ही इथे लक्ष्मीधरांची व उच्चवर्णीयांची मिरासदारी झाली आहे. प्राथमिक शिक्षणापासून श्रीमंत श्रेष्ठींच्या शाळा व गरीबांच्या शाळा असे ठळक वर्गीकरण इथे आढळते. पहिल्या प्रकारच्या शाळा संख्येने थोड्या, अमाप खर्चाच्या, इंग्रजी माध्यमाच्या व पोषाखी असतात. मराठी संस्कृतीपासून मुलांमुलींना जाणीवपूर्वक दुरावण्याचे कार्य या शाळा पद्धतशीरपणे करीत असतात. दुसऱ्या प्रकारच्या शाळा बहुधा सरकारी, संख्येने विपुल, माफक खर्चाच्या वा मोफत असतात आणि त्यांत माध्यम बहुधा मराठी व विद्यार्थीवर्ग निम्न, मध्यम व गरीब अशा स्तरांमधून आलेला असतो. गुणवत्तेच्या दृष्टीने त्या स्वाभाविकच दुय्यम असल्याने हुशार विद्यार्थ्यांची कुचंबणा होते.

पात्रतेनुरूप पदे, प्रतिष्ठा, जीवनमान व सुखसोयी त्यांना मिळू शकत नाहीत. शिक्षणसंस्थांचे केवळ प्रशिक्षण देणे एवढेच कार्य नसते तर योग्य व्यक्तीची योग्य स्थानासाठी निवड करण्याचे तितकेच महत्त्वाचे कार्यही त्यांच्याकडून होणे अपेक्षित असते.

विद्यमान स्वरूपात या देशातील शिक्षणसंस्था एकीकडे वरिष्ठ वर्गातील अपात्रांना उच्च पदांवर बसवीत असतात तर त्याच वेळी निम्न वर्गातील सत्पात्रांना त्यांच्या पात्रतेची पदे नाकारून उपेक्षित ठेवण्यास सहाय्यक होतात. समाजात उपलब्ध असलेल्या संकुल गुणवत्तेचा लाभ मिळवण्यापासून राष्ट्राला वंचित ठेवण्याचा अपराध तर यातून घडतोच, शिवाय समाजाचे विभाजन दोन परस्पर व्यावर्तक गटांमध्ये होऊन सामाजिक अभिसरणाच्या प्रक्रियेस खीळही बसते.

**इंग्रजी माध्यमाच्या शाळा : पांढरे हत्ती**

शिक्षणसंस्था ह्या जर सामाजिक अभिसरणास पोषक ठरायच्या असतील तर समाजाच्या भिन्न स्तरांमधून गुणवत्तेनुसार उमेदवार निवडून

त्यांना एकत्र आणण्याचे प्रयत्न त्यांच्याकरवी झाले पाहिजेत. मराठी माध्यमाचा अंगीकार करून शिक्षणक्षेत्रात बोकाळलेली नवी वर्णाश्रम-व्यवस्था मोडीत काढता येईल. इंग्रजी माध्यमाच्या खर्चिक शाळांचे पांढरे हत्ती समाजातील मूठभरांच्या हिताखातर पोसणे हा या समाजवादी म्हणवणाऱ्या गरीब देशात अक्षम्य गुन्हाच ठरला पाहिजे. मराठी भाषेतून संस्कारित झालेल्या मनावर स्वदेश, स्वसंस्कृती व स्वाभिमान यांचे बीजारोपण अधिक सुलभपणे केले जाऊ शकेल. इंग्रजी भाषेच्याद्वारे स्वतःला समजून घेण्याचा प्रयत्न हा द्राविडीप्राणायाम तर खराच शिवाय यातून होणारा आत्मपरिचय हा बहुधा विकृत असून त्याची परिणती आत्मतिरस्कारात होण्याची मोठीच शक्यता असते. किंबहुना आपल्या आजपर्यंतच्या अनुभवाने हे संशयातीतपणे सिद्ध झालेले आहे. आजची आत्मविस्मृत सुशिक्षित पिढी या समाजाशी तद्रूप होऊच शकत नाही. भोवतालच्यांशी बोलणे तिला कमीपणाचे वाटते. समाजाबद्दल त्यांची भावना परात्मतेची असते.

सर्व स्तरीय शिक्षणाचे व सामाजिक व्यवहाराचे एकच एक माध्यम झाले म्हणजे इंग्रजी बोलणे, वागणे, शिष्टाचार व राहणी यांना जी एक विलक्षण, खोटी प्रतिष्ठा आज या समाजात प्राप्त झाली आहे ती निकालात निघू शकते. आंग्लभाषाभाषी व मातृभाषाभाषी यांच्यात आज प्रचंड दरी निर्माण झाल्याने जी संवादशून्यता या समाजाच्या बोकांडी बसली आहे ती फार भयंकर व्याधी आहे. समाजातील उपेक्षित घटकांच्या ठिकाणी एकाकीपणा, तुटलेपणा, वरिष्ठांविषयी असूया-मत्सर व तज्जन्य जीव-घेणा संघर्ष असे दोष प्रादुर्भूत होणे क्रमप्राप्त ठरते. एकजिनसी समाज-निर्मितीच्या दृष्टीने हे अत्यंत घातक आहे.

एकभाषिक संवादाद्वारे सामाजिक अभिसरणाची प्रक्रिया प्रभावी झाली म्हणजे आपोआपच कला, साहित्य, विज्ञान आदींचा सर्व स्तरांमध्यें प्रसार होतो. नवे विचार, नवे शोध, नवे सर्जन वगैरे अनेक क्षेत्रात अधिक सकस व निकोप भर पडणे शक्य होते. राष्ट्राच्या सर्व बहुमुखी निर्माणशक्ती समाजहितैक्यबुद्धीने वापरल्या जाऊ शकतात. सामाजिक संरचना अधिक

लवचिक बनून सामाजिक व्यवहार अधिक सुसंस्कृत मानवी पातळीवरून चालू शकतात. पारंपारिक व गतानुगतिक विचाराच्या कोषातून व्यक्ती व समूह यांची मुक्तता होऊन बुद्धिनिष्ठा व विवेकदृष्टी यांची झपाट्याने जोपासना होऊ शकते. जातीय वा वर्गीय एकाकीपणा व उपेक्षा आणि त्यातून अटळपणे उद्‌भवणारा असंतोष व विद्रोह यामुळे संभवणाऱ्या विप्लवी उत्पातापासून समाज बचावतो आणि सर्वांगसुंदर, स्थिर, निरोगी व प्रगतिमान समाजाची उभारणी शक्य होते. संस्कृतीच्या वटवृक्षाची मुळे खोल समाजाच्या तळागाळापर्यंत पोचून तो अधिक दृढमूल होतो.

केवळ सार्वत्रिक मराठी माध्यम झाले म्हणजे यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणे येथील ताठर सामाजिक स्तर नाहीसे होऊन समाजाचे मन्वंतर घडून येईल, असा या प्रतिपादनाचा अर्थ नाही. इतर अनेक मार्गांनी कसून प्रयत्न व्हावे लागतील. परंतु शिक्षणाच्या प्राथमिकपासून विश्वविद्यालयीन पातळीपर्यंत व विशेषीकृत शिक्षण देणाऱ्या उच्च शिक्षणसंस्थांपर्यंत सर्वत्र मराठी भाषेचा अवलंब झाल्यास सामाजिक अभिसरणाच्या वाटेतील एक फार मोठा अडसर दूर होणार आहे एवढे मात्र ठामपणे म्हणता येते.

# मराठीतून विज्ञान आणि परिभाषा

स्वातंत्र्योत्तर काळात भाषेच्या निमित्तानं सतत वगवेगळे कार्यक्रम हाती घेण्यात आले होते आणि त्याचा कमीअधिक प्रमाणावर उपयोगही झालेला आहे. प्रस्तुत निबंधात त्या ओघानं काही विचारांना उजाळा देण्याचा, काही बाबींचं परिशीलन करण्याचा आणि विज्ञानाच्या क्षेत्रातील भाषिक समस्यांचा ऊहापोह करण्याचा संक्षिप्त प्रयत्न केलेला आहे.

भाषा ही वरकरणी मानवानं आत्मसात केलेली आणि मानवी व्यवहारांसाठी आवश्यक असलेली अत्यंत सरळ साधीसोपी बाब आहे. भाषाशास्त्रीय विवेचनाच्या जंजाळात गुंतवून न घेता भाषेबद्दल काही मूलभूत गोष्टी सांगता येतील : यापैकी सर्वाधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषा ही सार्वभौम असते. माणूस हा स्वत:च्या विचारांना, कल्पनांना आणि काही अंशी आंतरिक भावनांना भाषेच्या माध्यमातूनच व्यक्त करीत असतो. भाषा ही मनाचा आरसा होऊन सर्व मानवी व्यवहारांना शब्दबद्ध करते. अनुभवाच्या, जाणिवांच्या सर्व सूक्ष्म स्तरांना भाषा ही अभिव्यक्तीचं साधन म्हणून स्पर्श करीत असते. भाषा अशा तऱ्हेनं व्यक्तीव्यक्तींमधील संवादांचा, संप्रेषणाचा पायाभूत आधार असते.

समाजाची व्याख्या व्यक्तीव्यक्तींतील नात्यांचा गुंतावळा म्हणून करण्याची पुरातन पद्धती आहे. त्याच्याच जोडीने भाषेचा सूक्ष्म विचार करणाऱ्या आधुनिक विचारवंतांना समाज ही व्यक्तीव्यक्तींतील संप्रेषणाची संहती म्हणून विशेष महत्त्वाची बाब वाटते. भाषेचा संबंध समाजाच्या सर्व अंगांशी, सर्व स्तरांशी, सर्व प्रक्रियांशी, विचारांशी, नीतीशी, व्यवहारांशी, धारणांशी आणि धोरणांशी असतो. संस्कृती जितक्या अंगांनी विकसित होत जाते त्या सर्व अंगांची आणि विकासाची दिशा अशा तऱ्हेने त्या संस्कृतीतील, समाजातील भाषिक क्षमतेशी संबद्ध असते. ज्ञान आणि विज्ञान, इतिहास आणि वर्तमान, व्यक्ती आणि समूह, समूह आणि समाज, समाज आणि संस्कृती, दास्य आणि स्वातंत्र्य, प्रगती आणि अधोगती अशा सर्वच द्वंद्वांना अंगभूत करणारी भाषा ही सार्वभौम आणि पायाभूत गोष्ट मानून क्लॉड लेव्ही स्ट्राउससारखे समकालीन विचारवंत मानववंश-शास्त्रालासुद्धा भाषाविज्ञानाचाच एक पोटभाग म्हणून प्रस्थापित करतात. या विचारप्रणालीची व्याप्ती एवढी विशाल होत जाते की, कुठल्याही राष्ट्राची आर्थिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक आणि पर्यायानं सर्वंकष प्रगती ही, त्या राष्ट्राच्या भाषिक आविष्काराच्या विकासापाशीच येऊन ठेपते.

स्वातंत्र्यानंतरची एकतीस वर्षे उलटून गेल्यानंतरही आपल्याला भाषे-सारख्या मूलभूत आणि गंभीर समस्येतून धडपणे सुटता आलेलं नाही, याचं कारण आपल्या राष्ट्रीय जीवनात घट्ट रुतून बसलेल्या इंग्रजी वसाहतवादाच्या आगंतुक मुळ्यात आहे, ही गोष्ट सारासार विचार करणाऱ्या सर्वच भारतीयांना माहीत आहे. इंग्रजांचा वसाहतवाद हा वरकरणी उदारमतवादाचा बुरखा पांघरलेला आणि म्हणूनच अतिशय विषाक्त, अतिशय घातुक होता. ज्या वसाहतीवर पूर्णपणे अवलंबून रहा-यचं आणि तिचं शोषण करायचं, ती वसाहत नामशेष होऊ नये याची काळजी घेण्याच्या इराद्यानंच इंग्रजांनी आधुनिकता आणि उदारमतवादी धोरण स्वीकारलं. पैकी त्यांनी पहिलीच गोष्ट म्हणून इंग्रजीचं शिक्षण द्यायला सुरुवात केली आणि एका संसर्गजन्य रोगाचा फैलाव आपल्या

गुलामी वृत्तीच्या मध्यमपक्षी उच्चवर्णीयांमध्ये आणि या शास्त्र्यांच्या कृपाछत्राखाली भरभराट होऊ इच्छिणाऱ्या वर्गामध्ये मोठ्या प्रमाणावर सुरू केला. इंग्रजीवर पोसलेल्या या पिढीनं हळूहळू आपली सर्व सांस्कृतिक पाळंमुळं तोडून टाकली आणि इंग्रजी ही विश्वभाषा आहे, इंग्रजीशिवाय ज्ञानाच्या कक्षा वाढत नाहीत इत्यादी भ्रम फैलावले. दुर्दैवानं स्वातंत्र्यानंतरही सत्तेवर आलेल्या मूठभर लोकांनी आपल्या विशाल बहुभाषी देशात इंग्रजीशिवाय तरणोपाय नाही असा अपसमज रूढ करून शासनाची भाषा म्हणून इंग्रजीला प्रतिष्ठा दिली आणि देशी भाषांना दुय्यम स्थान मिळालं. इंग्रजीच्या या पोकळ युक्तिवादामागे संख्येने अत्यल्प अशा विशिष्ट वर्गानं ४०–५० कोटी लोकांवर बिनधास्त राज्य करण्याची कुटिल राजनीती होती, ही गोष्ट राम मनोहर लोहियांसारख्या दूरदर्शी विचारवंतांनी आयुष्यभर सांगितली तरी त्यांचा आवाज शास्त्र्यांच्या आणि त्यांनी भौतिक इहवादाच्या काठ्या लावून उभ्या केलेल्या दलालांच्या कोलाहलात दबून गेला, ही अतिशय दुर्दैवी बाब आहे. वसाहतवादाच्या या जखमा इतक्या खोलवर रुजलेल्या आहेत की, आजसुद्धा कुठल्याही प्रशासकाची कार्यक्षमता ही निव्वळ त्याच्या इंग्रजीतून लिहिलेल्या मसुद्यांवरच अवलंबून असते.

इंग्रजीच्या वर्चस्वाचं गुणगान गाणाऱ्या या गुलामी वृत्तीच्या मूठभर लोकांनी आपली सत्तास्थानं अबाधित राखण्यासाठी असंख्य जागी विविध पातळ्यांवर संघर्ष पेरून ठेवले. शहराविरुद्ध खेडी, सर्वसामान्य जनतेविरुद्ध नोकरशाही, देशी संस्कृतीविरुद्ध इंग्रजी संस्कृती, पूर्वेविरुद्ध पश्चिम आणि सर्वांत महत्त्वाचा संघर्ष म्हणजे साहित्य व सामाजिक शास्त्रांविरुद्ध विज्ञानशाखा. या अखेरच्या संघर्षाचा परिणाम म्हणूनच 'इंग्रजी हटाओ' मोहिमेला आपल्याकडे विज्ञानशाखेतील लोकांनी पराकोटीचा विरोध केला. इंग्रजीचा विरोध करून देशी भाषांतून विज्ञान शिकवणं केवळ अशक्य आहे असं समजणाऱ्यांचा अपसमज काही स्थावर प्रमेयांवर अवलंबून असतो. एक म्हणजे देशी भाषांतून विज्ञान शिकवल्यानं आपले विद्यार्थी इंग्रजीतील विज्ञानाच्या सतत वाढत जाणाऱ्या ज्ञाना-

पासून वंचित होतील. त्यामुळे वैज्ञानिक प्रगती खुंटेल. त्याचा राष्ट्रावर गंभीर परिणाम होईल. दुसरं देशी भाषांतून विज्ञान शिकवण्याइतक्या देशी भाषा समृद्ध नाहीत. तिसरं, देशी भाषांना अजूनपर्यंत आपला पारिभाषिक संग्रह वाढवता आला नाही व निश्चितही करता आला नाही. इंग्रजीची हकालपट्टी केल्यास पारिभाषिक पर्यायांसाठी 'संस्कृत' या मृतभाषेकडे वळावे लागेल व 'संस्कृत' सारख्या क्लिष्ट भाषेमुळे आकलनक्षमता नाहीशी होईल. इंग्रजीच्या उच्चाटनामुळे प्रांताप्रांतांत संप्रेषण उरणार नाही व भाषिक स्तरावर अनागोंदी माजेल इत्यादी इत्यादी.

थोडासा सखोल विचार केल्यास या युक्तिवादातील फोलपणा कुणाच्याही लक्षात येईल. इंग्रजीच्या उच्चाटनाने वैज्ञानिक प्रगती थांबेल असं 'मिथ' पसरवणाऱ्यांना निश्चितच एक गोष्ट माहीत असेल, जगातल्या कुठल्याही राष्ट्राने आपली भाषा सोडून इंग्रजीचा अवलंब केलेला नाही आणि त्यामुळे त्यांचा विकासही थांबलेला नाही. रशिया, चीन, जपान, जर्मनी, फ्रान्स, नेदरलॅन्डस्, झेकोस्लोव्हाकिया, इटली अशी कितीतरी राष्ट्रे इंग्रजीशिवायच वैज्ञानिक क्षेत्रात संपन्न झाली आहेत आणि होत आहेत. त्यांना देशी भाषांची अडचण जाणवली असेलही, पण त्यांनी त्यावरही पर्याय शोधून देशी भाषा संपन्न केल्याच. फक्त आपल्यासारख्या अडाणी वसाहतींनाच ही समस्या उग्र वाटते. देशी भाषा संपन्न नाहीत म्हणून त्यांना दुय्यम दर्जा दिला गेला आणि त्या संपन्न झाल्यावरच इंग्रजी घालवण्याची नीती आपल्या आंग्लानुयायी गुलामी सत्ताधीशांनी स्वीकारली. पण भाषा वापरल्याशिवाय संपन्न होत नाही, प्रवाही होत नाही ही साधी गोष्ट शास्त्र्यांनी लक्षात घेतली नाही. शिवाय देशी भाषांशी जवळीक असलेल्या भाषेचा आवश्यक तेव्हा उपयोग केल्याने फारसे बिघडण्यासारखे नाही. एरव्ही तरी विज्ञानाच्या क्षेत्रातील परिभाषा ही लॅटिन आणि ग्रीक भाषांवरच आधारित नाही काय ? महाविद्यालयांतून विज्ञान शिकणाऱ्या मुलांना निव्वळ लॅटिन आणि ग्रीक शब्दच त्यांच्या मूळ अर्थाशिवायच पाठ करण्यात कितीतरी शक्ती वाया घालवावी लागत नाही काय ? तेव्हा परिभाषा आवश्यक त्या ठिकाणी वापरल्यास काही नुकसान होईल

ही भीती व्यर्थ आहे. उलट देशी भाषांतून वाऱ्याचदा ऐकलेल्या, वाचलेल्या शब्दांमुळे परिभाषा सोपी व कमीत कमी शक्तीचा वापर करावयास लावणारी ठरेल. तेव्हा देशी भाषांमुळे आकलनशक्ती वाढून विज्ञानाचा प्रसारच होईल. आणि शिकण्याची व विचार करण्याची भाषा एकच झाल्यामुळे विज्ञानासोबतच वैज्ञानिक दृष्टिकोनही वाढीस लागून सामाजिक-सांस्कृतिक क्षेत्रांतील अवनती थोपवण्यास मदत होईल. देशी भाषांच्या संवर्धनाचा व संपन्नतेचाही मार्ग म्हणजे लवकरात लवकर विज्ञानादी सर्व शिक्षणाचं माध्यमच देशी भाषा करून त्यांना प्रस्थापित करणं, एवढाच आहे. सतत वापरल्याशिवाय भाषा संपन्न होत नाहीत, शब्दांना नेमके अर्थ प्राप्त होत नाहीत आणि त्या भाषेतून नवे अनुभव, नव्या जाणिवा, नवे विचार व्यक्त करणं शक्य होत नाही. ही वस्तुस्थिती कुणाच्याही लक्षात येण्यासारखी आहे. स्वातंत्र्यानंतर तात्काळ देशी भाषांचा व राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा वापर केला असता तर आज दिसून येणारी देशी भाषांची अपरिपक्वता राहिली नसती आणि तीस-एकतीस वर्षांच्या कालावधीत या सर्वच भाषांना निश्चित परिभाषाही लाभली असती.

मधल्या काळात मराठीतून विज्ञानाची पुस्तकं लिहिली गेली नाहीत असं नाही. पण जे काही प्रयत्न झाले ते पुरेसे नव्हते आणि त्या प्रयत्नांकडे सर्वसामान्य लोकांचं आवश्यक तेवढं लक्ष वेधलं गेलं नाही. मुळात कुठल्याही भाषेला प्रस्थापित करण्याचा सर्वात मोठा प्रयत्न हा मुलांसाठी निर्माण करण्यात येणाऱ्या पुस्तकांतून होऊ शकतो. आपल्याकडील बालसाहित्याची एकांगी वाढ लक्षात घेतल्यास कुमारांसाठी मराठीतून लिहिणाऱ्या लेखकांच्या वैज्ञानिक दृष्टिकोनाचे दारिद्र्य नजरेत भरण्यासारखे आहे. मुलांचे कुतूहल जागृत ठेवणारे, त्यांच्या प्रश्नांची वैज्ञानिक दृष्टिकोनातून उत्तरे देणारे, त्यांना सतत प्रश्न विचारायला उत्सुक करणारे आणि मूळ म्हणजे विचार करायला शिकवणारे साहित्य आपल्याकडे अगदीच अत्यल्प प्रमाणात झाले. जे काही लिहिले गेले त्यातही मुलांच्या मानसशास्त्राचा विचार नव्हताच. आजही त्यात फरक पडलेला नाही ही गोष्ट गेल्या दहा-अकरा वर्षांतील शासनाने पारितोषिक देऊन

गौरविलेल्या बालसाहित्याचं परिशीलन केल्यास सहज लक्षात येण्यासारखी आहे. साने गुरुजींच्या तोलामोलाचा आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अवलंब करणारा एकही साहित्यिक आपल्याकडे नसावा हे दुर्दैव आहे. या संदर्भात प्रसिद्ध चित्रपट निर्माते आणि दिग्दर्शक सत्यजित राय यांचे उदाहरण आदर्श आहे. सत्यजित राय यांनी मुलांसाठी बंगालीमधून अनेक रहस्यकथा लिहिल्या आहेत. या रहस्यकथांमधून अगदी सहजपणे निसर्गातील विविध वस्तू, वनस्पती, प्राणी, प्रक्रियांचे वैज्ञानिक दृष्टिकोनातून राय विवेचन करतात आणि लोकभ्रमांचं निराकरण करतात. त्यांच्या रहस्यकथांची हिंदी भाषांतरे उपलब्ध आहेत. त्यातील "सोना केल्ला" मध्ये राजस्थानातील सृष्टीची, उंटांच्या हालचालीची सूक्ष्म वर्णने मुलांना विज्ञानाभिमुख करणारी आहेत. "गंगटोक में घपला" या दुसऱ्या पुस्तकातही निसर्ग, प्राणीसृष्टी, भौतिकीय विश्वाची मुलांच्या स्तरावरील माहिती आकर्षक आणि महत्त्वाची आहे. मुख्यतः मोठ्यांसाठी लिहिलेले पण भाषेच्या सरळ सोप्या आणि बोल-भाषेच्या स्तरावरील शैलीमुळे व्यंकटेश माडगुळकरांचे जंगल आणि प्राण्यांवरील, पक्ष्यांवरील लेख मुलांना अतिशय आवडतात हे मी पाहिलेले आहे. विज्ञानाचा संपूर्ण आधार असलेलें हे साहित्य मोठ्या प्रमाणावर लिहिले गेले आणि मुलांमध्ये त्याचा प्रसार होत गेला तर वैज्ञानिक परिभाषेचे प्रश्न आज वाटतात तेवढे गंभीर राहणार नाहीत, हे निश्चित. त्यातून भाषाही विकसित होत जाईल आणि विज्ञानातील जटिल संकल्पना, सिद्धांत आणि त्यांचं उपयोजन सहज सोपे आणि संवादाच्या, संप्रेषणाच्या स्तराचे होऊ शकेल. हीच गोष्ट विज्ञानकथांच्या प्रसारानेही मोठ्या प्रमाणावर साध्य होऊ शकते. तिकडे एच. जी. वेल्स, हक्सलेपासून पेरे बूए आणि आयझॅक ॲसिमॉव्ह इत्यादींसारखे प्रतिभावंत सतत विज्ञानकथा लिहून एका बाजूने वैज्ञानिक दृष्टिकोनाचा, नव्या संकल्पनांचा, कल्पनाशक्तीला आव्हान देणाऱ्या विज्ञाननिष्ठेचा प्रसार आणि प्रचार करीत आहेत तर दुसरीकडे भाषेला संपन्न करून ती लोकमानसात प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. आपल्याकडे मात्र जयंत नारळीकरांचा

अपवाद वगळता असे प्रयत्न फारसे झाले नाहीत. शिवाय नारळीकरांनाही मर्यादा आहेत. त्यांचा आदर्श मुळातच फ्रेड हॉयल या त्यांच्या गुरूशी संबद्ध आहे. पण हॉयल, असिमॉव्ह सारख्यांना आणि स्ट्रट्गास्की, अॅब्रॅमॉव्ह-सारख्या विज्ञानकथांच्या लेखकांना ज्या विज्ञानाभिमुख संस्कृतीचा पाया असतो तो पायाच आपल्या देशात नसल्याने नारळीकरांना सगळ्या गोष्टी मुळापासून सुरू करण्याची आणि सामाजिक-सांस्कृतिक परिस्थितीच्या एकसंघ व सर्वंकष आकलनाची आवश्यकता नाकारून चालण्यासारखे नाही.

विज्ञानविषयक लेखनाला प्रोत्साहित करण्याचे असे लेखन मराठीतून करून घेण्याचे महत्त्वाचे सांस्कृतिक कार्य सर्वश्री चिं. श्री. कर्वे, ना. वा. कोगेकर, पु. ग. देवरस, रा. वि. सोवनी इत्यादींनी अतिशय निष्ठेने आणि प्रामाणिकपणे केलेले आहे. शिवाय हे कार्य आपल्या शासनानेही साहित्य संस्कृती मंडळाद्वारे सुरू केलेले आहे.

मराठीतून विज्ञानविषयक लेखन करण्यासाठी परिभाषेची अडचण हे कारण पुढे केले जाते हे वर आलेच आहे. जी परिभाषा काही थोडेथोडके प्रस्थापित करीत आहेत त्या परिभाषांविषयी आत्यंतिक टोकाची भूमिका घेणाऱ्यांची संख्याही वाढीसच लागत आहे. परिभाषेबाबत असा दृष्टिकोन बाळगणे घातक आहे. असेल ती परिभाषा जास्तीत जास्त प्रमाणात वापरल्यास तिच्यात योग्य बदल होण्याची शक्यता आहे. एरव्ही मराठीतून प्रतिशब्द देणे अशक्यच आहे अशा ठिकाणी सोपे इंग्रजी व संस्कृत शब्द वापरण्यासही काय हरकत आहे हे कळणे कठीण आहे. आत्यंतिक आंग्ल-धर्मिता किंवा संस्कृतनिष्ठाही या परिभाषांबद्दल बोलणाऱ्यांत व टीका करणाऱ्यांत दिसून येते आणि हीही गोष्ट अयोग्यच आहे. चुकीच्या पद्धतीने मराठीकरणाचा आग्रह परिभाषेच्या बाबतीत धरणारा वर्गही परिभाषा स्थिर करण्यासाठी अडसर निर्माण करणाराच आहे. उदाहरणार्थ "भू" हा धातू गृहीत धरून त्यापासून भूमिती, भूगोल, भूगर्भशास्त्र, भूजल इत्यादी पारिभाषिक शब्द करणे केव्हाही योग्यच. आता "भू" ऐवजी "जमीन" असा शब्द योजिल्यास इतर साधित शब्दांची अवस्था कशी

असेल याची कल्पना करून पाहिल्यास चुकीच्या मराठीकरणाचा आग्रह किती हास्यास्पद आहे हे लक्षात येईल. वरील शब्द अशा पद्धतीने जमीनमापन, जमीनगोल, जमीनशास्त्र, जमीन पाणीशास्त्र वगैरे शब्द होतील हेही लक्षात घेणे आवश्यक आहे. विज्ञानाच्या क्षेत्रात जिथे शक्य असेल तिथे इंग्रजी शब्दही ठेवल्याने काही नुकसान होण्यासारखे नाही. मुळात परिभाषा ही विज्ञानाच्या विशेषित ज्ञानासाठी आहे आणि त्यासंबंधीच्या पारिभाषिक शब्दांचे लोकभाषेत हळूहळू रूपांतर, विचलन होत राहीलच. इंग्रजीबाबतही असेच झालेले आहे हे विसरून चालण्यासारखे नाही. इंग्रजीवर पोसलेल्या आपल्या क्रियाशून्य पिढीने टोकाच्या भूमिका घेऊन, पारिभाषिक शब्दांबाबत भीती निर्माण केलेली आहे आणि सतत मराठीतून विज्ञान लिहून लिहूनच हा न्यूनगंड घालवला जाऊ शकतो. आता शासनाने पहिलीपासून विज्ञानाची क्रमिक पुस्तके काढल्यामुळे पारिभाषिक समस्येचा अडसर काही प्रमाणात दूर झालेला आहेच. मुलांना 'क्रोमोसोम्स' पेक्षा 'गुणसूत्रं' जवळची वाटतात. 'न्यूक्लिअस' पेक्षा 'केंद्रक' परिचित आणि आकलनीय वाटतो. अशा वेळी या मुलांच्या इतर अवांतर वाचनासाठी शासनाने विज्ञानाच्या मराठी लेखनाला सर्वाधिक महत्त्व देऊन काही कार्यक्रम आखणे अगत्याचे आहे. शिवाय मराठीतून महाविद्यालयीन शिक्षण सुरू करणेही आवश्यक आहे. कधीतरी अपरिहार्य ठरणारी ही गोष्ट आजच, आत्ताच सुरू केल्याने वेळेचा अपव्यय टळेल. मुलांची इंग्रजीतून विज्ञानाच्या निव्वळ पाठांतराची म्हणजे विनोबांच्या भाषेत "खाऊन ओकण्याच्या शिक्षणाची घातक प्रक्रिया" थांबेल. कुतूहल आणि विचार यांना प्राधान्य मिळेल आणि विज्ञानाची व विज्ञानाधिष्ठित समाजाची सर्वंकष प्रगती संभवनीय होईल.

विद्यापीठांनाही यात आपली भूमिका समजूनउमजून पार पाडावी लागेल. आपल्याकडील प्राध्यापक निव्वळ ऐहिक भोगवादात अडकून "करिअरिस्ट" होण्यासाठी अनुपयोगी संशोधनपत्रांची संख्या फुगवण्यात वेळ, पैसा व शक्ती नष्ट करीत असतात. त्यासोबतच त्यांनी दरवर्षी एखाद्या तरी उत्कृष्ट परदशी विज्ञानग्रंथाचा मराठी किंवा अन्य देशी

भाषेत अनुवाद केला आणि विद्यापीठांनीही त्याला संशोधनाइतकेच मूल्य काही काळ जरी दिले तरी वैज्ञानिक भाषा संपन्न होऊ शकेल आणि त्याचे सृजनशील परिणामही दिसू लागतील. शिवाय विज्ञानातील सर्व संशोधन आज शक्य नसलं तरी प्रत्येक संशोधन प्रबंधाचा मराठी संक्षेप पदव्युत्तर विद्यार्थ्यांना आवश्यक करण्यात यावा. दुर्दैवाने आज तरी अशी सूचना हास्यास्पद ठरू शकते. कारण आपल्या विद्यापीठातून सामाजिक-सांस्कृतिक बांधिलकी मानून, समाजाचा सर्वंकष विचार करणाऱ्या व असा विचार रुजवण्यासाठी अहर्निश प्रयत्न करणाऱ्या नैतिकतावादी आदर्शवादाचा पुरस्कार करणाऱ्यांची पिढी दिवसेंदिवस दुर्मिळ होत आहे.

वसाहतवादाचे अखेरचे अवशेष फेकून देऊन विवेक, स्वातंत्र्य आणि न्यायाधिष्ठित मूल्यांचे आचरण करणारी पिढी निर्माण करणाऱ्या, वस्तूंच्या वर्चस्वापेक्षा त्यांच्या मूल्यांना अर्थ प्राप्त करून देणाऱ्या, बंधमुक्त समूहातील विवेकनिष्ठ नागरिकांना तयार करण्यासाठी सहाय्यशील ठरणाऱ्या आणि नागरिकत्व आणि स्वातंत्र्य यांच्या संयोगातून व्यक्तिगत सृजनक्षमता फुलवणाऱ्या जटिल, संक्लिष्ट व कठीण होत चाललेल्या समकालीन आयुष्यात जगण्याला अर्थ प्राप्त करून देणाऱ्या उदारमतवादी शिक्षणपद्धतीची, संकल्पना बेकन, देकार्त, स्पिनोझा, हाब्ज, अगदी फ्रॅंझ फॉनपर्यंत सर्व विचारवंतांनी हळूहळू विकसित केली आहे. या उदार-मतवादी शिक्षणपद्धतीला आधुनिक व समकालीन अधिष्ठान मिळवण्या-साठी विज्ञाननिष्ठेची, वैज्ञानिक दृष्टिकोनाची नितांत आवश्यकता आहे. शिवाय आंद्र सॅखराव्हसारख्या श्रेष्ठ वैज्ञानिकांनी सर्वस्व झुगारून ज्या शांतता, सहजीवन आणि बौद्धिक स्वातंत्र्याच्या मूल्यांसाठी अहोरात्र संघर्ष केला त्या मूल्यांच्या प्रस्थापनेसाठीही विज्ञानाधिष्ठित उदारमत-वादी शिक्षणाची आवश्यकता आहे आणि असं शिक्षण रुजवण्यासाठी, त्याची गती वाढवण्यासाठी मराठीतून शिक्षण देण्याशिवाय, कुठलीही सबब न सांगता सर्व स्तरावर विज्ञानाचं व इतर सर्व शास्त्रांचं माध्यम मराठी किंवा अन्य देशी भाषा करण्याशिवाय पर्याय नाही.

# अन्य भाषिक व मराठीचे प्रशिक्षण

भाषा आणि समाज ह्यांचे संबंध अत्यंत निकटचे असल्यामुळे कुठल्याही समाजात जाऊन राहण्याची वेळ आली तर त्या समाजाची भाषा प्रथम शिकून घेणे आवश्यक असते. एका समाजाने दुसऱ्या समाजाची भाषा शिकणे ही आजच्या काळाची गरजच आहे. भारतासारख्या बहुभाषी देशात तर एकमेकांच्या भाषा शिकल्याने आपापसातले गैरसमज दूर होऊन आपण एकमेकांच्या अधिक जवळ येऊ शकू ह्या विचारानेच आंतर भारतीसारख्या संस्था भारतीयांना एकमेकांच्या भाषा शिकण्याच्या कार्यक्रमांना प्रोत्साहन देतात. काळाची गरज ओळखूनच भारतीय भाषा संस्थान सारख्या संस्थेत भारतातल्या हिंदी आणि इंग्रजी सोडून इतर सर्व भारतीय भाषा शिकवण्याची सोय उपलब्ध करून देण्यात आली आहे.

साहजिकच भाषा शिकवणे म्हणजे विद्यार्थ्याला त्याच्या भाषिक सवयींकडून आपल्या भाषिक सवयींकडे वळवणे. शिकणाऱ्याला आधीची एक भाषा—त्याची स्वभाषा—येत असल्यामुळे नवीन भाषेतले ध्वनि-संकेत, ते वापरण्याची त्या समाजाची पद्धत, त्या भाषेतली वाक्यनिर्मितीची कला ह्या गोष्टी शिकवणे हे काम अवघड होऊन बसते. विद्यार्थ्याला स्वत:च्या भाषेप्रमाणेच विचार न करत बसता, जणू नैसर्गिकपणे,

सहजपणे, दुसरी भाषा वापरता येईल अशी तयारी करून घेण्याचे काम तज्ज्ञ शिक्षकालाच जमू शकते.

अलीकडच्या काळात भाषा शिकवणे हे एक स्वतंत्र शास्त्र झाले आहे, त्यासाठी शिक्षकाजवळ काही विशेष पात्रता असावी लागते, ह्याची जाणीव व्हायला लागली आणि हळूहळू भाषा शिक्षणात निरनिराळ्या पद्धती वापरून पाहण्याकडेही आपले लक्ष जाऊ लागले आहे.

**भाषा शिकवण्याची उद्दिष्टे**

भाषा शिक्षणात, आपण आपली भाषा कोणाला शिकवतो आहोत, का शिकवतो आहोत, त्या मागची उद्दिष्टे काय आहेत, भाषा शिकणारे परदेशी आहेत की स्वदेशातलेच अन्यभाषिक आहेत, ह्या गोष्टींही विचारात घ्याव्या लागतात. विद्यार्थ्यांच्या शिकवण्याच्या उद्दिष्टांवर नेमके काय शिकवायचे हे अवलंबून असते. उदाहरणार्थ, आमच्या केंद्रात शिकायला आलेले परप्रांतातले शिक्षक दहा महिने इथे राहून भाषेच्या लिपीपासून साहित्यापर्यंत प्रवास करतात. श्रवण–संभाषण–वाचन–लेखन ह्या चारही कौशल्यांवर प्रभुत्व मिळवतात आणि आपापल्या प्रांतांत परत जाऊन नव्याने आत्मसात केलेली भाषा आपल्या शाळांतल्या विद्यार्थ्यांना शिकवतात. भारताच्या नव्या पिढीला भाषेद्वारे इथल्या बहुविध संस्कृतीची ओळख पटावी, हे ह्या सर्व शिक्षणातले उद्दिष्ट आहे. या उलट भारतीय स्टेट बँकेच्या महाराष्ट्रात राहणाऱ्या अमराठी अधिकाऱ्यांना केवळ बँकेचे व्यवहार मराठीतून करता येण्याइतके मराठी शिकवावे लागते. पाच आठवड्यांच्या शीघ्रगती अभ्यासक्रमाने हे साध्य करायचे असते. एखाद्या परदेशी विद्यार्थ्याला फक्त लोकांत मिसळून बोलता यावे एवढ्यासाठी, किंवा मराठीतला एखादा लेख वाचता यावा इतकी मर्यादित अपेक्षा असते. मास्को रेडिओतल्या चार विद्यार्थिनीही निवेदिकेच्या कामासाठी मराठी शिकून गेल्या आहेत. थोडक्यात, भाषा शिकण्यामागचा उद्देश लक्षात घेऊन ती कशी आणि किती काळ शिकवायची ते ठरवावे लागते आणि त्यानुसार शिक्षकाला आपली साधनसामग्री वापरावी लागते.

## भाषेच्या वर्णनात्मक व्याकरणाची आवश्यकता

जी भाषा शिकवायची तिचे पद्धतशीर वर्णन उपलब्ध असले पाहिज आणि शिक्षकांनी त्याचा सूक्ष्म अभ्यास केला पाहिज. वर्णनात्मक व्याकरण हा भाषा शिकवण्याचा मूलभूत आधार आहे. भाषा शिकवण्यापूर्वी शिक्षकाला आपल्या भाषेच्या सवयी शोधून काढता आल्या पाहिजेत, म्हणजेच भाषेचे पृथक्करण करण्याची दृष्टी त्याच्याजवळ हवी. शिकवायच्या भाषेचे ध्वनी कोणते आहेत, शब्दांची रूपे कशी होतात, त्यातली वाक्यरचना, काळांचा वापर इत्यादी गोष्टी त्याला कळल्या पाहिजेत. सुदैवाने मराठीचा वर्णनात्मक अभ्यास उपलब्ध असल्यामुळे आपल्याकडे ही अडचण हल्ली एवढी जाणवत नाही.

परकी भाषा अगदी कमीत कमी वेळात शिकता यावी यासाठी इंग्लंड-अमेरिकेसारख्या प्रगत देशांत निरनिराळे प्रयोग सतत चालू आहेत. त्यासाठी अत्याधुनिक साधनांचाही उपयोग केला जातो. अशी साधने वापरणे आपल्याला परवडण्यासारखे नसले तरी शास्त्रीय पद्धतींनी भाषेचे पृथक्करण करून त्यावर आधारित उत्तम साधनसामग्रीचा वापर करणे आपल्याला सहज शक्य आहे.

## अडचणी व अनुभव

भाषाशास्त्रावर आधारित अशा वर्णनात्मक व्याकरणातून मराठीची वैशिष्टये समजली तरी मराठी शिकवताना येणाऱ्या अडचणी सोडविणे हे वाटते तितके सोपे काम नसते, कारण अडचणी काही एकाच प्रकारच्या, सर्वसामान्य नसतात. त्यात अनेक प्रकारच्या गुंतागुंती असतात. जो विद्यार्थी मराठी शिकतो त्याच्या मातृभाषेच्या घडीप्रमाणे त्याची अडचण असते. त्यामुळे एकाच वेळी वेगवेगळ्या मातृभाषा बोलणारा संमिश्र वर्ग असला तर प्रत्येकाच्या अडचणीही वेगवेगळ्या असतात आणि त्या वेगवेगळ्या प्रकारे हाताळाव्या लागतात. तरीसुद्धा पूर्वीच्या अनुभवातून अमूक भाषिक विद्यार्थी नेमका कुठे अडेल हे सहज लक्षात येते आणि त्याप्रमाणे प्रत्येकाकडे लक्ष पुरवून त्याला अडचणींमधून पार पाडण्यासाठी मदत करता येते.

हिंदी बोलणाऱ्या सर्वच विद्यार्थ्यांच्या चुका एकाच प्रकारच्या नसतात आणि त्यांच्या चुकांचे मूळ अनेकदा त्यांच्या बोलीत सापडते. तसेच वेग-वेगळ्या चुका करणारे आर्य भारतीय भाषा वंशज आणि द्राविडियन भाषा वंशज असेही दोन ढोबळ गट पाडून चालत नाही. मराठी, गुजराथी, काश्मिरी ह्या एकाच वंशाच्या भाषा असल्या तरी गुजराथी ही मराठीला अधिक जवळची असल्यामुळे ती बोलणाऱ्यांच्या चुकांचे प्रमाण खूप कमी असते. अर्थात इतर अमराठीपेक्षा पूर्वेकडील भाषा ह्या दक्षिणेकडील भाषांशी बऱ्याच बाबतीत मराठीपेक्षा अधिक साम्य दाखवतात, त्यामुळे त्यांच्याही चुका हिंदी, गुजराथी भाषिकांपेक्षा द्राविडियन भाषिकांच्या चुकांशी जास्त जुळत्या असतात. ध्वनींच्या स्तरापासून आपण उदा-हरणे पहायला सुरुवात करू. हिंदी भाषिकांना मराठीचा अंत्य दीर्घ स्वर **अ** हा उच्चारताना येणाऱ्या अडचणींमुळे ते 'डोकं' ऐवजी 'डोका', 'घरं' ऐवजी 'घरा' असे उच्चार करतात. आसामी, बंगाली 'असं' ऐवजी 'ओसो' किंवा 'ओशो' म्हणतात. हिंदी भाषिकांकडून ड-ळ मध्ये होणारा घोटाळा बंगाली आसामींचा स-श मधील घोटाळा, ख, घ, ठ, ढ, इत्यादी महा-प्राणयुक्त व्यंजनांचा उच्चार करण्यात तामिळ भाषिकांची अडचण लक्षात घेऊन शिक्षकाला ह्या ध्वनींची पुन्हा पुन्हा तालीम करून घ्यावी लागते. मराठीतील तालव्य आणि दंत्य च, छ, ज, झ, चा परभाषिकांकडून होणारा घोटाळा सर्वांना माहीतच आहे. लेखनाच्या वेळी हा फरक विद्यार्थ्यांच्या कदाचित लक्षात येऊ शकतो, पण बोलताना मात्र इतर गोष्टी कितीही उत्तम शिकल्या तरी 'आमचा' ऐवजी 'आमच्या' 'तुझा' ऐवजी 'तुझ्या' 'झाली' ऐवजी 'झ्याली' असे उच्चार शेवटपर्यंत सुधारता येत नाहीत. ह्या अडचणींवर मात करणारे विद्यार्थी सापडतच नाहीत असे मात्र नाही. 'तोच चंद्रमा नभात' ह्या गाण्यातले च-च्य भेद पक्के लक्षात ठेवून अगदी बिनचूक उच्चार आणि चाल उचलणाऱ्या आमच्या एका हिंदी भाषिक विद्यार्थ्याचे लोकांनी सर्वत्र कौतुक केले होते. पण कित्येकदा बाकी सर्व उत्तम मराठी बोलणारे विद्यार्थी च-च्य चे सदोष उच्चार करतातच.

फ्रेंच भाषेतील कंठ्य कंपक 'र' हा जिव्हाग्रीय कंपक र ची सवय अस-

लेल्या मला शेवटपर्यंत उच्चारता आला नव्हता, तो स्वभाषेच्या उच्चारांचा जबरदस्त परिणाम म्हणूनच होय. परदेशी विद्यार्थ्यांत फ्रेंच भाषिकांना ट ठ ड ढ ण हे ध्वनी उच्चारताना अवघड जाते तर इंग्रजी भाषिकांना त थ द ध न उच्चारायला कठीण वाटतात. त्याचप्रमाणे शब्दांच्या ठराविक जागी अघोष व्यंजने महाप्राणासह उच्चारण्याची इंग्रजी माणसाची सवय घालवावी लागते, कारण त्यामुळे मराठीत अर्थभेद होण्याची शक्यता असते (उदाहरणार्थ 'कान' बद्दल 'खान', 'काकी' बद्दल 'खाकी'). एका रशियन विद्यार्थिनीला अतिशय उत्तम मराठी येत असूनही तिचे चुकीचे स्वराघात सुधारण्यासाठी मला एक संपूर्ण महिना घालवावा लागला होता.

## लिंगभेदामुळे होणारे घोटाळे

मराठीतली 'नामे' हा प्रकार शिकणाऱ्याला सर्वांत अवघड जातो. नामांमध्ये प्रथम त्यांचे सरळ रूप म्हणजे प्रत्ययरहित मूळ रूप आणि नंतर सामान्य म्हणजे शब्दयोगी अव्ययापूर्वी होणारे रूप इत्यादी माहिती क्रमवार शिकवली तरी अमराठी भारतीय विद्यार्थ्यांच्या बाबतीत मुख्य अडचण येते ती नामांच्या लिंगांची. द्राविड भाषिकांना स्त्री-पुरुष भेद सोडला तर इतर सर्व नामे नपुसकलिंगी वापरावयाची सवय, हिंदीसारख्या काही आर्यवंशीय भाषांमध्ये दोनच लिंगे तर काही भाषांमध्ये नामांच्या लिंगांना व्याकरणदृष्टचा महत्त्वच नाही. मराठीतल्या नामांच्या लिंगाचा वाक्यातल्या सर्व विकारी शब्दांवर आणि क्रियापदावर प्रभाव असल्यामुळे लिंग तर आठवलेच पाहिजे. त्यात स्त्रीलिंगी व्यंजनांत नामे अधिकच कठीण. 'शाल' चे अनेकवचन 'शाला' करायचे की 'शाली', सामान्य रूप 'शाले' करायचे की 'शाली', असा प्रश्न पावलोपावली पडत असतो. 'मी हिरवा शाल विकत घेतलं' असे वाक्य कोणी लिहिले असले तर ते क्षम्य ठरवता येत नाही. एक वेळ 'मी हिरवा शाल विकत घेतला' असे क्षम्य ठरवावे लागते, कारण निदान शिकणाऱ्याला वाक्यरचनेचे तत्त्व तरी कळले आहे असा त्याचा अर्थ होतो. त्यातून संस्कृतोद्भव भाषांमध्ये लिंगाचा अधिकच गोंधळ होतो, कारण त्यात

शब्द एकच पण त्याची लिंगे मात्र भिन्न असे कित्येकदा घडते (उदा. दुकान: मराठी-नपु. हिंदी-स्त्री., चहा: मराठी- पु. हिंदी–स्त्री., व्यक्ती : मराठी-स्त्री. हिंदी-पु.). पुष्कळदा लिंगांच्या जोडीला शब्दांचे बाह्यरूप एकच पण अर्थ मात्र भिन्न हेही शिकणाऱ्याला मोठे अडचणीचे ठरते (उदा. महाराष्ट्र **शिक्षेत** फार पुढे आहे. शिक्षा — मराठी शिक्षा, हिंदी शिक्षण) हिंदी शिकलेले द्राविड भाषिक आणि पूर्वभारतीय विद्यार्थीसुद्धा हिंदीच्या प्रभावामुळे ह्या चुका करतात.

लिंगांची अडचण सोडवण्याचा एकच मार्ग म्हणजे भाषा शिकवायला सुरुवात करतानाच सर्वनामे दर्शक विशेषणांबरोबर लक्षात ठेवण्याची सवय विद्यार्थ्यांना लावावी. 'हा हात', 'ही वही', 'हे फूल' अशा प्रकारे लिंग लक्षात ठेवणे बरेचसे सोपे जाते. नामासंबंधीची सर्व उपयुक्त माहिती सांगणारा शब्दकोशही तयार करण्याची फार आवश्यकता आहे.

आणखी एक गोष्ट म्हणजे मराठी नामांच्या सात विभक्ती शिकवण्या-ऐवजी वर्णनात्मक अभ्यासाचा आधार घेऊन नामांचे सरळ रूप आणि प्रत्यय लावण्यापूर्वी होणारे विकारक्षम सामान्य रूप अशी दोनच रूपे शिकवणे. इंग्रजीत नामांपूर्वी येणारे संबंध शब्द (उदा. *on* the table, *under* the table) मराठीत नामांच्या सामान्य रूपानंतर येणाऱ्या शब्दयोगी अव्ययांप्रमाणे (उदा. टेबला + **वर**, टेबला + **खाली**) असतात असे दाखवून दिले म्हणजे मराठी भाषा शिकणे इंग्रजी माणसाला एकदम सोपे वाटायला लागते. नामांच्या एकवचन, अनेकवचन, आणि सामान्य-रूपांचे तक्ते बनवून वर्गात लावता येतात. त्यासाठी नामांचे त्यांच्या अंत्य-स्थानांप्रमाणे वर्गीकरण करणे (उदा. घोडा, पेला, चष्मा, डोळा — आकारान्त पुल्लिंगी नामे), त्याला अनुसरून त्यांचे अनेकवचन कसे होते ते दाखवणे (उदा. घोडे, पेले, चष्मे, डोळे), त्याचे सामान्यरूपाचे नियम लक्षात आणून देणे (उदा. घोड्या–,पेल्या–,चष्म्या–,डोळ्या–), ह्या सामान्यरूपांच्या अनेकवचनाचा नियम सांगणे (घोड्यां–,पेल्यां–,चष्म्यां-, डोळ्यां–), आणि शेवटी नामांच्या ह्या सामान्यरूपांना लागणाऱ्या संबंधदर्शक प्रत्ययांची एक वेगळी यादी देणे, (उदा. वर, खाली, जवळ,

शेजारी, चा इ.) इतकी सामग्री शिक्षकाला विद्यार्थ्यांच्या हाती द्यावी लागते. त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांची भाषा आणि मराठी यांत असलेले साम्य लक्षात आणून दिल्यानेही शिकण्याचे काम बरेच सोपे होते. शाळेत केव्हा-तरी संस्कृतच्या धर्तीवर स्वभाषा शिकली असल्यामुळे अशा विद्यार्थ्यांना नामांना विभक्ती नाही वगैरे कल्पना धक्कादायक वाटतात. पण त्यांच्या भाषेलाही वर्णनात्मक व्याकरण लागू पडते. (उदा. हिंदी–**घोडा** ए. व. **घोडे** अ. व. **घोडे**-पर) हे त्यांच्या लक्षात आणून दिल्यानंतर बऱ्याचशा गोष्टी त्यांना सरळ, सोप्या वाटायला लागतात.

**भाषिक साधर्म्य**

किंबहुना भाषा शिकताना आणि शिकवताना तुलनात्मक आणि विरोधात्मक पद्धतींचा फार उपयोग होतो. विद्यार्थ्याला स्वभाषेतले आणि लक्ष्य भाषेतले विरोध लक्षात आणून दिल्याने मुद्दे चटकन लक्षात राहतात. तुलनेने दोन भाषा कुठे सारख्या आहेत, कुठे वेगळ्या आहेत हे समजून त्यांचा आत्मविश्वास वाढतो. तुलना आणि विरोध दाखवण्यासाठी शिक्षकाला प्रत्येकाची भाषा माहीत असलीच पाहिजे असे नाही आणि ते शक्यही नाही. पण विद्यार्थी पुन:पुन्हा करत असलेल्या चुकीकडे लक्ष देऊन त्याचे कारण शोधून काढण्याचा शिक्षकांनी प्रयत्न केला म्हणजे तो विद्यार्थ्यालाच स्वत:च्या भाषेशी लक्ष्य भाषेची तुलना करायला प्रवृत्त करू शकतो. त्यामुळे विद्यार्थी स्वत:च अडचणींवर मात करू शकतो. 'श्रद्धा', 'भाषा' यांसारख्या शब्दांचे सामान्य रूप करायला हिंदी भाषिक विद्यार्थी का चुकतात ह्याचे कारण त्यांच्या भाषेच्या तुलनेनेच त्यांच्या लक्षात रहाते. प्रत्यय वापरतानाही स्वभाषेचा प्रभाव सुटू शकत नाही. उदा. 'सर्व शहरांहून पुणं शहर चांगलं आहे' ऐवजी 'सर्व शहरांमधून पुणं. . . . . . . .'

वाक्यरचनांच्या अडचणीही अशा तुलनेने समजू शकतात. 'मला दोन भाऊ आहेत' ह्याऐवजी 'माझे दोन भाऊ आहेत' असा घोटाळा हिंदी भाषिक पुन:पुन्हा का करतो, ह्याचा खुलासा आपल्याला 'मेरे दो भाई हैं।' ह्या हिंदी वाक्यरचनेतच मिळतो. 'मी तुम्हाला विनंती केली' ऐवजी

'मी तुमच्याशी विनंती करतो', 'तुमच्याशी भेट करून खूप बरं वाटले' ही हिंदी भाषिकांची चूक किंवा 'मी डॉ. कत्रेला आभार मानतो' ही इंग्रजी भाषिकांची चूक त्या त्या भाषांच्या वाक्प्रचारांच्या सवयींमधूनच लक्षात आणून देता येते. म्हणून वाक्प्रचार शिकवताना '—ची काळजी कर—' किंवा '—ला विनंती कर—' असेच शिकवणे सोयीचे पडते.

मराठीतला भूतकाळ ही आतापर्यंत अशीच एक शिकणाऱ्याला धसका घ्यायला लावणारी गोष्ट समजली जात असे. ह्याचे कारण आतापर्यंतच्या व्याकरणकारांनी मराठी काळांचा खुलासा हा संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवर केल्यामुळे भाषा शिकणाऱ्यांचाच फार गोंधळ होत असे. पण सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ. कालेलकर ह्यांनी मराठी वाक्यरचनांचा वर्णनात्मक खुलासा इतका व्यवस्थित आणि नेटका केलेला आहे की त्याबाबत मराठी शिकवणाऱ्याला फारशी अडचण पडत नाही. पण असे असले तरीही मराठी भूतकाळ हा प्रकार एकूण गुंतागुंतीचा एवढ्यासाठी ठरतो की त्याची वैशिष्टये ही इतर भारतीय भाषांपेक्षा फार वेगळी आहेत. सकर्मक धातूंच्या बाबतीत तर हा गोंधळ फारच होतो. दक्षिणेकडच्या चार भाषांशी, पूर्वेकडच्या तीन आर्यवंशीय भाषा या बाबतीत साम्य दाखवतात. त्यामुळे 'तो लाडू खाल्ला', 'ती लाडू खाल्ली', 'साईबाबा इथे येऊन चमत्कार दाखवले', अशा वाक्यरचनांकडून त्यांना 'त्यांनी लाडू खाल्ला', 'तिने लाडू खाल्ला', 'साईबाबांनी इथे येऊन चमत्कार दाखविला' अशा वाक्यरचनांकडे वळवणे एकूण अवघडच काम असते. 'त्यांनी वाघाला मारलं', 'डॉक्टरांनी रोग्याला तपासलं' ह्यासारख्या तटस्थ वाक्यरचनाही पुनःपुन्हा घटवून घ्याव्या लागतात. मराठीतल्या जोडवाक्यांतही स्वभाषेच्या सवयी डोकावतातच. (गाईड आम्हाला तिथली माहिती देत होता ज्या ठिकाणी आम्ही जात होतो).

भाषा शिकवायची ती आधी बोलायला आणि ऐकायला. पण त्याचबरोबर ती वाचायला आणि लिहायला शिकवायची असेल तर त्यात पुन्हा अडचणी असतातच. त्यात मुख्य अडचण असते ती लिपीतल्या काही रूढ दोषांचीच. काही ध्वनी उच्चारातून नाहीसे होतात पण लेखनात मात्र

तसेच शाबूत रहातात. (उदा. मराठी, ष, ऋ इत्यादी). देवनागरी लिपी येत असलेल्या विद्यार्थ्यांच्याही लेखनात सुरुवातीला काही घोटाळे होतात.

दोन भाषा बोलणाऱ्या समाजाच्या संस्कृतीचा, चालीरीती, परंपरा ह्यांचासुद्धा भाषा शिकताना परिणाम होत असतो. आई मात्र 'माझी' (ए. व.) आणि वडील मात्र माझे (अ. व.) असे का, 'वडील' ऐवजी माझा 'बाप' का नाही, इतर सर्व भाषेत आईला 'मां' शब्द, मराठीतच आई का? 'आपण' ऐवजी 'तुम्ही' शब्द वापरणारे लोक उद्धट आहेत का, अशा नाना तऱ्हेच्या शंका थेट पाश्चात्यांपासून अमराठी भारतीयांपर्यंत मराठी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या असतात, त्या सोडवणे अर्थातच शिक्षकाचे काम असते.

भाषा ज्याला शिकवायची तो नेमका कुठे अडतो हे अचूक हेरून त्याप्रमाणे आपली शिकवायची सामग्री तयार करणे, भाषेचा शास्त्रशुद्ध अभ्यास, शिकणाऱ्याचे मानसशास्त्र, इत्यादी सर्व गोष्टींचे ज्ञान त्याला हवे. भाषाशिक्षणाच्या क्षेत्रातील नित्य नव्या तंत्रांची माहिती त्याला जरूर असावी, पण अखेर त्याने आपल्या अनुभवावर आधारलेल्या तंत्राचाच वापर करावा.

# भाषा व शब्दसाधना

**भाषा** हे माणसाचे सर्वोत्तम संचित आहे तसेच इतर जीवसृष्टीपासून त्याची पृथगात्मता ठरवणारे व्यवच्छेदक लक्षणही आहे. वाचा व त्यामुळे उत्पन्न झालेली भाषा, ही माणसाला मनुष्यत्व प्रदान करणारी दोन महत्त्वाची साधने होत. या साधनांमुळेच तो इतर सृष्टीहून वेगळा झाला व निसर्गावर विजय मिळवू शकला. या साधनांमुळेच ज्ञान-विज्ञानाचा संचय तो करू शकला व हे विचारधन वारसाहक्काने पुढील पिढ्यांकडे संक्रमित करू शकला. भाषेमुळेच मनुष्यप्राणी आज प्रगतीच्या सर्वोच्च शिखरावर विराजमान झालेला आपल्याला दिसतो. भाषा ही याप्रकारे माणसाच्या सर्वतोमुखी विकासाचे एक प्रमुख साधन असल्यामुळे तो सदैव त्याच्या जिव्हाळयाचा व प्राणभूत असा विषय राहिला आहे. माणूस लहानपणी आपल्या आईच्या कुशीत जे बालिश बोबडे बोल शिकला तीच त्याच्या विचार-भाव-संकल्पनाची स्वाभाविक भाषा होय व म्हणूनच त्याच्या वैचारिक तसेच मानसिक भरणपोषणाचे त्याची भाषा हेच प्रभावी व एकमेव साधन असू शकते. एका कवीने म्हटल्याप्रमाणे 'मातेचिया गोड दुग्धामृताची सवै आमुचि तोडल्यापासूनी तुझ्याच दुग्धावरी, मायभाषे ! आम्ही वाढलो पोसलो जीवनी' हे उचितच होय.

मातेच्या दुधाप्रमाणे आमचे आंतरिक भरणपोषण भाषेच्या आधारेच होत असते. म्हणूनच 'माता तशी स्वभाषा' असे सार्थ उद्‌गार एका कवीने काढले आहेत. माणूस हा ज्याप्रमाणे भाषेच्या आधारे वाढतो, मोठा होतो त्याचप्रमाणे भाषा ही माणसाच्या ज्ञानाच्या कक्षा जसजशा विस्तार पावत जातात तसतशी वाढते, विकसित होते. भाषा संस्कृती घडवू शकते तसेच माणूसही भाषा घडवू शकतो. या दोन्हीही अन्योन्य-सहायक व परस्परावलंबी गोष्टी होत. भाषा इतिहास घडवू शकते याची प्रत्यक्ष प्रचितीच आपण घेतली आहे. भाषेचे हे सामर्थ्य आपल्या कवींनी पूर्वीच ओळखले होते. म्हणूनच त्यांनी परोपरीने मराठीचे गोडवे आपल्या रचनांतून गायले आहेत. ज्ञानेश्वरांनी पुढील शब्दांत शब्दांचे सामर्थ्य वर्णन केले आहे. 'जरी बिंब तो बचकेचि एवढे । तरी प्रकाशा त्रिभुवन थोकडे । शब्दांची व्याप्ति एणेपाडे । अनुभवावी. ' तसेच तुकारामांनीही 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने, शब्दांचीच शस्त्रे यत्न करू' म्हणून शब्दांचा गौरव केला, शब्दांना संपत्ती मानली व त्यांचे सामर्थ्य वर्णन केले. शब्द हे याप्रमाणे नवे जीवन घडवू शकतात. नव्या संस्कृती निर्मू शकतात, समाजाची नवी जडणघडण करण्यामध्ये कृतिशील असू शकतात. मात्र त्या शब्दांत जीव ओतणारे ज्ञानेश्वर, तुकारामांसारखे प्रतिभा-संपन्न त्याकरिता लागतात. दिवसा नुसत्या काचेच्या नळ्या दिसणारी अक्षरे रात्री जशी विजेच्या संचाराने झगझगू लागतात त्याप्रमाणे एरव्ही जड, निष्प्राण असणारे शब्द अशा प्रतिभावंतांच्या प्रतिभेच्या फुंकरीने चैतन्यमय व सामर्थ्यसंपन्न होतात. भाषेची व शब्दांची ही महती आपण नीट ओळखली तर आपल्या भाषेच्या आजच्या स्थितीकडे व ती सुधारण्याकरता काय करावयाला हवे याकडे आपण अधिक आत्मीयतेने बघू शकू असे वाटते.

### अस्वाभाविक गोष्टींचा बडेजाव कशासाठी

मराठी भाषेच्या इतिहासाकडे एक नजर टाकली तर आपल्याला असे दिसते की, य॰ भाषेच्या निर्मितीपासून तो आजतागायत तिचा प्रवास हा

अनेक संकटांतून, खाचखळग्यांतून, काटयाकुटयांतून झालेला आहे. अनेक संतमहंतांनी, छत्रपती शिवाजी महाराजांसारख्या राजांनी तिची पाठ-राखण केली असली तरी तिचे भाग्य आजतागायत सर्वार्थांनी उजळलेच नाही, असे आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. तिच्या निर्मितीकाळी तिला संस्कृतचा सासुरवास सोसावा लागला, पुढे ती फारसीच्या जोखडाखाली सापडली व नंतर इंग्रजीचा वरचष्मा सुरू झाला. या तीनही भाषांच्या जाचाखाली तिची नांदणूक झाली असल्यामुळे आजची तिची परिस्थिती फारशी स्पृहणीय नाही. गेल्या शे-दीडशे वर्षांत शिक्षणाचा, आधुनिक विद्यांचा, वृत्तपत्रादींचा प्रसार वाढला असल्यामुळे काहीशा व्यापक क्षेत्रात तिचा वावर होत असला तरी अनेक महत्त्वाच्या क्षेत्रांत आजही तिला मज्जाव आहे. न्यायालयांतून, कार्यालयांतून, कचेऱ्या-कारखान्यांतून, विद्यापीठांतून व प्रयोगशाळांतून तिचा अनिर्बंध संचार व्हावयाचा आहे. त्या दृष्टीने तिचे अंगभूत सामर्थ्य वाढविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. ही भूमिका केवळ एका रोमँटिक किंवा भावनिक वृत्तीतून मांडलेली नसून तिच्यामागे एक तर्कशुद्ध विचार आहे. मातृभाषा हेच माणसाच्या सर्व व्यवहारांचे स्वाभाविक माध्यम आहे. लहानपणापासून ज्या भाषेत तो आपले सर्व भाव, विचारविकार, कल्पना-संकल्पना व्यक्त करतो व मांडतो तीच त्याच्या विकासाची स्वाभाविक अशी प्राणभूत शक्ती होय. असे असताना इतर अस्वाभाविक गोष्टींचा बडेजाव कशासाठी मिरवायचा ? यामुळे परकीय भाषेचे माहात्म्यच आपण वाढवतो असे नसून नव्या पिढीची प्रतिभाशक्तीच आपण खच्ची करीत आहोत असे म्हटले पाहिजे. अल्पवयात मातृभाषेखेरीज अन्य भाषेचा बोजा बाल-मनावर पडला तर नुकतीच स्वतःच्या भाषेत विचार करण्याची शक्ती लाभलेल्या बालमनावर त्याचा विपरीत परिणाम होतो व त्याची सर्व विचारशक्तीच जायबंदी होते असे या क्षेत्रातील अनेकांचे मत आहे हे लक्षात घेतले पाहिजे. इंग्रजीच्या बडेजावामुळे आधीच वर्णवर्गजातींनी बुजबुजलेल्या आपल्या समाजात आंग्लशिक्षित व तदितर असा एक नवा भेद निर्माण होईल व शिक्षित-अशिक्षितांतील सामाजिक दरी

बुजविण्याच्या प्रयत्नांना खीळ बसेल अशी भीती वाटते. सामाजिक अभिसरण वाढविण्याच्या दृष्टीनेही आपल्या भाषेचा वापर सर्व क्षेत्रांत वाढविणे नितांत आवश्यक आहे, त्याकरिता आपली भाषा समृद्ध केली पाहिजे.

## सोवळेपणा मराठींकरिताही असू नये

आज सर्व ज्ञान-विज्ञान, सर्व तंत्रशास्त्रे प्रचंड वेगाने वाढत आहेत. हा पल्ला त्वरेने गाठण्याकरिता आपल्या भाषा सामर्थ्यसंपन्न करावयाच्या असतील तर काही भरीव व कालबद्ध कार्यक्रम हाती घेणे आवश्यक आहे. संतमहंतांनी या 'मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळ' केला आणि अध्यात्माची पेठ वसविली तशी भौतिक विद्या, आधुनिक शास्त्रे यांच्या पेठाही या नगरीत वसवल्या पाहिजेत. या भौतिक विद्या आपल्या भाषेत आणावयाच्या असतील तर त्याकरिता अधिक प्रयत्न करणे आवश्यक आहे. मराठी भाषेच्या दृष्टीने या विद्यांतील सर्व संकल्पना, सर्व विचार हे नवीन व आपल्या भाषेला अपरिचित असल्यामुळे ते आणण्याकरिता काही कृत्रिम उपाय योजावे लागतील. तसे पाहू गेले तर आजची सर्व जीवनपद्धतीच पाश्चात्य वळणाची झाली आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. आजची आपली राहणी, आजचे आपले आचार-विचार, आजची आपली शासनयंत्रणा, राज्यव्यवस्था, शिक्षण या सर्वच गोष्टी पाश्चात्य विचारांच्या संपर्काने व संसर्गाने आलेल्या आहेत. त्यामुळे आपल्या भाषिक परंपरेत या सर्व संकल्पना व्यक्त करण्याकरिता शब्द-संपदा मिळणे दुरापास्त आहे. ही शब्दसंपदा असल्याशिवाय आजची दीन-दुबळी भाषा सामर्थ्यसंपन्न होणार नाही. भाषा विकसित होणे व भाषेत सर्व विद्या अवतीर्ण होणे हे जर घडवून आणावयाचे असेल तर भाषेची शब्दसंपत्ती वाढविणे अगत्याचे आहे. ती वाढविण्याकरिता आपण अनेक गोष्टींची योजना करू शकतो. आपल्या भाषेत असलेल्या शब्दांना नवे अर्थ देऊन, नव्या अर्थाने ते शब्द योजू शकतो. परकीय भाषेतील शब्द उसने घेऊ शकतो किंवा नवीन शब्द घडवू शकतो. तशी

कुठलीही भाषा ही शुद्ध नसते. प्रत्येक भाषेला इतर भाषेतून उसनवारी करावीच लागते. जपानसारख्या प्रगत राष्ट्रात 'जनता' या शब्दाकरिता प्रतिशब्द नाही. कारण दोन हजार वर्षे अविच्छिन्नपणे एकच राजघराणे राज्य करीत असल्यामुळे या भाषेत केवळ प्रजा हीच संकल्पना आहे. जिथे राजा असेल तिथे प्रजाच असणार. लोक जेव्हा सार्वभौम होतात तेव्हाच 'जनता' अशी एक स्वतंत्र संकल्पना प्रस्थापित होऊ शकते. अशा प्रगत देशांनीसुद्धा या संकल्पना व्यक्त करण्याकरिता मोठ्या प्रमाणावर उसनवारी करून नवीन शब्द घेतले आहेत व घडविले आहेत. या बाबतीत कुठल्याही प्रकारचा सोवळेपणा मराठीनेही स्वीकारू नये व तसा तो राजभाषेपुरता स्वीकारण्यात आलेला नाही.

अनिवार्य असेल तिथे संस्कृतचा आधार घ्यावा लागला असला तरी त्याच्यामागे काही एक विशिष्ट भूमिका आहे. महाराष्ट्राचा मुख्य सचिव हा बिहारच्या मुख्य सचिवाशी जेव्हा पत्रव्यवहार करील तेव्हा त्या दोघांनाही कुठल्यातरी एका संपर्कभाषेचा आश्रय घ्यावा लागेल व अशा वेळी दोघांचीही पदनामे जर एकच असतील तर संपर्क प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने ती मोठीच सोय होईल. म्हणून सरचिटणीस किंवा पंतसचिव हा शब्द मराठीला जवळचा वाटत असला तरी देखील मुख्य सचिव या शब्दाची निवड करणे अखिल भारतीय भूमिकेतून इष्ट ठरते. संस्कृतचा थोडासा अतिरेक वाटत असेल तर तो महाराष्ट्र राज्याने स्वीकारलेल्या या अखिल भारतीय भूमिकेमुळेच. अर्थात जिथे असे शब्द मराठी परंपरेच्या विरुद्ध असतील, त्या शब्दांचे मराठीत वेगळे अर्थ रूढ असतील, तिथे असे शब्द स्वीकारण्यात आलेले नाहीत. हे 'शिक्षा' या शब्दाऐवजी स्वीकारलेल्या 'शिक्षण' या शब्दावरून किंवा 'यातायात', 'समर्थन' या शब्दांऐवजी स्वीकारलेल्या 'दळणवळण', 'पाठिंबा' या शब्दांवरून उघड होते. सर्व भारतीय भाषा, ह्या संस्कृतोद्भव असल्या व सर्वांनी संस्कृतातून सर्व प्रकारे उसनवारी केलेली असली तरी मूळ संस्कृत शब्दांचे भिन्नभिन्न अर्थ निरनिराळ्या भाषांत रूढ आहेत. अशा वेळी आपल्या भाषेची प्रकृती व प्रवृत्ती लक्षात घेऊन शब्दनिश्चिती करावी लागते व

तसे धोरण भाषा सल्लागार मंडळाने स्वीकारलेले आहे. शब्दनिश्चिती करताना त्या शब्दांचा प्रत्यक्ष भाषेतील प्रयोगही लक्षात घ्यावा लागतो. त्या शब्दांमुळे साधित शब्द बनविता येतील किंवा कसे हेही बघावे लागते व एकूण भाषेच्या प्रवाहात एकजीव होण्याच्या दृष्टीने तो शब्द किती उपयुक्त आहे याचे अवधानही ठेवावे लागते. अशी त्रिविध अवधाने बाळगून तयार झालेली भाषा ही मराठी भाषिकांच्या मनीमुखी खेळू लागेल व तिचा घरीदारी सर्वत्र सर्रास वापर होऊ लागेल.

## शासन व्यवहारातील मराठी

दहा-बारा वर्षांपूर्वी नवीन व अपरिचित असलेले संसद, विधानसभा, विधेयक, अध्यादेश, प्रदूषण, आयोग, महाभियोग, प्रशासन, ऊर्जा, सौर-शक्ती, संकरित, रासायनिक, संकल्पना असे अनेक शब्द वापरण्यास आज आपल्याला प्रत्यवाय वाटत नाही. अशी नवीन शब्दरचना करण्याकरिता स्वाभाविकपणेच मराठीची जन्मदात्री संस्कृत हिचाच आश्रय घ्यावा लागतो. उपसर्ग व प्रत्ययप्रक्रियेनेच असे नवीन शब्द कुठल्याही भाषेत निर्माण होत असतात. इंग्रजी भाषा ही नवीन शास्त्रीय व तांत्रिक संकल्पना व्यक्त करण्याकरिता ग्रीक व लॅटीन भाषेचा आश्रय मुक्तपणाने घेते. 'मोनो', 'पेंटो', 'हैड्रो', 'अक्वा', 'फेरो' यांसारखे अनेक उपसर्ग इंग्रजीत वापरले जातात. क्लोरोफिल व व्हिटॅमिन हे शब्द तर दोन वेगळ्याच शब्दांपासून बनलेले आहेत. उर्दू भाषेतही अरबी भाषेतील मूळ शब्दांवरून असेच साधित शब्द बनविण्यात येतात हे, हुकूम, हुकूमत, हकिम, महकमा किंवा हाफिज, मुहाफिज, महफूज, हिफाजत यांसारख्या शब्दांवरून स्पष्ट होते. भाषाभिवृद्धीचा हा सर्वसम्मत मार्ग आहे, हे यावरून उघड होईल. म्हणून तांत्रिक शब्दनिर्मिती करण्याकरिता संस्कृतचा आश्रय घेणे अतिशय स्वाभाविकच नव्हे तर क्रमप्राप्तही आहे. गेल्या शे-दीडशे वर्षांत मराठी भाषेच्या विकासाचा आलेख जर आपण काढला तर संस्कृतमधून घेतलेल्या अक्षरशः शेकडो शब्दांची मोजदाद आपल्याला करता येईल. कुठलेही वृत्तपत्र, नियतकालिक, मासिक, ग्रंथ

वा पुस्तक उघडले व त्यातील ४–५ वाक्ये वाचली तरी याची प्रचीती आल्यावाचून राहणार नाही. महाराष्ट्रातील घरोघरी पोहोचलेल्या ज्ञानेश्वर, नामदेव, तुकारामापासून तो अगदी अलीकडच्या कवी, लेखक, साहित्यिक, पत्रकारांपर्यंत सर्वांनी आपल्या लेखनातून असे अनेक शब्द बनवले आहेत व वापरले आहेत. पुस्तक, कादंबरी, सुनीत, संपादक, मासिक, अर्थशास्त्र यांसारखे अनेक शब्द हे या शे-पाऊणशे वर्षांतले शब्द आहेत, यावर आज कुणी विश्वासही ठेवणार नाही. महाराष्ट्रातील जनसामान्यांच्या तोंडी या प्रकारचे शब्द लवकर रुळतात. त्यांना ते लवकर समजतात. त्यामुळे मराठी भाषेची ही एक प्रकृतीच आहे असे म्हटले पाहिजे. अर्थात असे करताना कुठल्याही एका भाषेचा अट्टाहास असता कामा नये. जे शब्द अगोदरच भाषेत ठाण मांडून बसलेले आहेत, रूढ झालेले आहेत, लोकांना समजताहेत, मग ते कुठल्याही भाषेतील असोत, ते स्वीकारले पाहिजेत व तसे ते स्वीकारण्याची भाषा सल्लागार मंडळाची व शासनाची भूमिका आहे.

शासनाने तयार केलेले कोश हे केवळ मार्गदर्शनपर असून मूळ मराठीतून लेखन करताना कर्मचाऱ्यांना स्वाभाविकपणे व सहजगत्या जे शब्द सुचतील, मग ते कुठल्याही भाषेतील असोत, त्यांचा त्यांनी सर्रास वापर करावा अशा सूचना त्यांना देण्यात आलेल्या आहेत. भाषा वाढविण्याचा मार्ग आजचा शब्दसंग्रह वाढविणे हा आहेच, त्याशिवाय तिचा प्रत्यक्ष वापर सर्व क्षेत्रांत मुक्तपणे करणे हाही आहे. भाषा वापरल्याशिवाय वाढणार कशी? म्हणून निरनिराळ्या विषयांच्या प्राध्यापकांनी व विचारवंतांनी आपले लेखन मूळ मराठीतून करण्याचा पायंडा पाडला तर आपोआपच त्यांची विचारप्रक्रियाही त्याच भाषेतून होईल व नवे शब्द घडतील व तसतशी मराठी भाषा समृद्ध होईल. भाषा वाढविण्यासाठी वर उद्धृत केलेले मार्गच सर्व विकासोन्मुख देशांत वापरले जात आहेत असे युनोने प्रकाशित केलेल्या इतिवृत्तावरून दिसून येते. जपान, इंडोनेशिया, इस्रायल, इजिप्त इत्यादी देशांनी अशा प्रकारे आपल्या भाषा वाढविण्याचा प्रयास चालविला आहे. भाषेची शब्दसंपत्ती

वाढविणे, तसेच सर्व विषयांमध्ये भाषेचा वापर करणे व सर्व विषयांवर मुळात त्या भाषेत लेखन करणे हे पथ्य पाळले व अशा प्रकारचा निर्धार शासनाने तसेच ज्ञान-विज्ञानावर लिहिणाऱ्या सर्व लेखकांनी व सर्व विचारवंतांनी केला तर मराठी भाषेचे भवितव्य अत्यंत उज्ज्वल आहे असे नि:संशय म्हणता येईल. या दिशेने सर्व मराठी भाषिक प्रयत्नांची परकाष्ठा करतील अशी आशा आहे.

# मराठी मुद्रणाचा दर्जा : आज आणि उद्या

मॅक्समुलर या महापंडितांनी संपादित केलेला ऋग्वेदाचा पहिला खंड १८४९ मध्ये इंग्लंडमध्ये ईस्ट इंडिया कंपनीतर्फे प्रसिद्ध करण्यात आला. अल्ड्स वा जेन्सन या आद्य मुद्राक्षर कलाकारांनी छापलेल्या वैभवशाली ग्रंथांच्या मालिकेत हा ऋग्वेद शोभून दिसतो. ग्रंथमुद्रणाचा तो एक अप्रतिम आदर्श आहे. या ग्रंथाच्या छपाईकरिता ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसला तीनशे नवीन मुद्राक्षरे तयार करावी लागली. या ग्रंथाची छपाई चालू असताना मॅक्सम्युलरना एक विलक्षण अनुभव आला. त्यांच्या हस्त-लिखितातील काही चुका प्रुफांमध्ये दुरुस्त केल्या जात व काही ठिकाणी त्यावर प्रश्नचिन्ह केलेले आढळे. आपल्या चुका काढणारा हा संस्कृततज्ज्ञ कोण हा प्रश्न त्यांना पडला. तेव्हा त्यांनी प्रेसकडे चौकशी केली की, तेथे कोणी संस्कृत पंडित अलीकडे या कामाकरता नेमण्यात आला आहे की काय ? त्यावर नकारात्मक उत्तर मिळाले. त्यामुळे ते अधिकच बुचकळ्यात पडले. तेव्हा याबाबत हे काम करणाऱ्या कंपोझिटरकडेच त्यांनी चौकशी केली. ही सर्व कर्तबगारी त्याचीच होती. त्याला संस्कृत मुळीच येत नव्हते,

परंतु अनुभवावरून संस्कृत कंपोज करताना हाताची हालचाल कशी होते याचे गणित त्याने मनाशी बांधले होते. या गणितास काही अपवाद आढळल्यास तेथे काही चूक आहे असे तो मानी. उदाहरणार्थ-इंग्रजीमध्ये 'h' अक्षरानंतर 's' अक्षर कधीच येत नाही; मध्ये 'a' किंवा 'i' असा स्वर येणारच. मराठीमध्ये 'ण' अक्षराने कोणत्याच शब्दाची सुरुवात होत नाही. अशा प्रकारचे आडाखे त्या इंग्रज कंपोझिटरने संस्कृतच्या बाबतीत मांडले होते. या ग्रंथाच्या विशुद्ध आणि सुंदर मुद्रणाचे हेच रहस्य आहे. एक साधा कंपोझिटरसुद्धा आपल्या कामात विलक्षण रस घेत होता. आपल्या मुद्रणाबद्दलची आत्मीयता आणि अभिमान हाच आदर्श मुद्रणाचा पाया आहे. 'हा मुळीचा झरा' आटलेला असेल तर मुद्रणही सदोष व निर्जीवच असणार.

### मराठी मुद्रणाचा दर्जा

आज आपल्या मुद्रणाचा दर्जा आंतरराष्ट्रीय मुद्रणाच्या तुलनेने अत्यंत सामान्य आहे, हे खेदाने मान्य केलेच पाहिजे. मुद्रणकलेचा सर्वोत्कृष्ट आदर्श कलाविषयक ग्रंथांत, आर्ट बुक्समध्ये आढळतो. परंतु अशा तऱ्हेचे ग्रंथ मराठीत जवळजवळ नाहीतच. मुद्रणाचे एक वैशिष्टच म्हणजे त्यामध्ये चुका करणे अत्यंत सुलभ आणि सहजसाध्य. अत्यंत दक्ष अशा मुद्रकास वा लेखकास मुद्राराक्षस कधी दगा देईल ते सांगता येत नाही. निर्दोष ग्रंथ-मुद्रणाकरिता दीर्घ तपश्चर्येची व कठोर शिस्तीची नितांत आवश्यकता आहे. या शिस्तीच्या अभावी 'शुद्धिपत्र' हा मराठी ग्रंथाचा एक अविभाज्य भाग झाला आहे. कलात्मकतेच्या दृष्टीने पृष्ठांची मांडणी, जॅकेट डिझाईन व मुख्य म्हणजे सुवाच्य व वाचनसुलभ छपाई या दृष्टीने फारच सुधारणा होणे आवश्यक आहे.

### मुद्रणाचे महत्त्व

उत्कृष्ट मुद्रणाकरिता पहिल्या प्रतीचे तांत्रिक ज्ञान, कलात्मक दृष्टि-कोन, व्यावहारिक दृष्टी व सुव्यवस्थापन यांची आवश्यकता आहे. आज

राष्ट्रीय मुद्रणाचा दर्जा हे एक सांस्कृतिक, तांत्रिक व आर्थिक प्रगतीचे चिन्ह समजले जाते. राष्ट्रीय संपन्नतेचा तो एक निर्देशांक आहे. आपल्या मुद्रणाचा दर्जा ही एक राष्ट्रीय प्रतिष्ठेची बाब आहे, अशी भावना निर्माण झाली पाहिजे. सुंदर व निर्दोष मुद्रण हाच व्यावसायिक उत्कर्षाचा एकमेव मार्ग होय. हे मुद्रण-व्यावसायिकांनी जाणले पाहिजे. तशीच ती एक व्यावसायिक जबाबदारीही आहे. त्याचबरोबर असे मुद्रण आनंद-दायक व उत्साहवर्धक असते. सुबक छापलेला ग्रंथ मुद्रकाच्या, लेखकाच्या व वाचकाच्या डोळ्यांचे पारणे फेडतो. तो एक अविस्मरणीय अनुभव असतो.

### टीम वर्क

निर्दोष व सुबक ग्रंथ मुद्रणाकरिता लेखक, प्रकाशक, मुद्रक व मुद्रणालयातील कर्मचारी, विशेषतः लेआऊट आर्टिस्ट, कंपोझिटर, मशिनमन, बायंडर यांच्यामध्ये उत्कृष्ट संघभावना असली पाहिजे. प्रथम म्हणजे प्रेसकॉपी स्वच्छ व अचूक असली पाहिजे. अनेकदा पहिले प्रुफ पाहिल्या-नंतरच लेखकांना अंतिम लेखनाची स्फूर्ती येते आणि मग चुका टाळणे कठीण होते. प्रुफे तपासणाऱ्या व्यक्तीला भाषेचे व मुद्रणाचे चांगले ज्ञान पाहिजे आणि विशेष म्हणजे त्याच्याजवळ भेदक व चिकित्सक दृष्टी असली पाहिजे. चांगला प्रुफ रीडर कोणीही सहजासहजी होऊ शकतो हा एक गैरसमज आहे. उत्कृष्ट मुद्रण ही एकटयादुकटयाची कामगिरी नाही. त्याकरिता टीमवर्कची आवश्यकता आहे. साधनसामग्री अर्थातच चांगली पाहिज. प्रथम म्हणजे टाईप चांगल्या स्थितीत असले पाहिजेत. त्यांची आबाळ नेहमीच होत असते. मोनो किंवा सुपरकास्टर यंत्रे, मोल्ड, मॅट्रिसिस व मेटल इत्यादी गोष्टी परिपूर्ण असल्या तरच चांगल्या मुद्रणयोग्य टाईपांची निर्मिती होऊ शकते. कागद व शाई चांगल्या प्रतीची असणे आवश्यक आहे. सुंदर ग्रंथाकरिता 'घटच कागद आणावे' हे समर्थांचे सूत्र आजही लागू आहे. आपल्या कागदाचा दर्जा सध्या तरी सर्वसाधारणपणे निकृष्टच आहे. कागदाची तर आता विलक्षण टंचाई असल्यामुळे तो

अधिक घसरण्याची धास्ती आहे. मराठी मुद्रणाचा भविष्यकालीन विचार करता शिकाऊ उमेदवारांच्या योजनेकडे अधिक लक्ष देणे आवश्यक आहे. मुद्रण व्यवसायाबद्दल या उमेदवारांना अभिमान वाटला पाहिजे. चांगला कंपोझिटर, मशिनमन किंवा बायंडर हा एक कलाकार आहे हा विचार या शिक्षणाचा पाया असला पाहिजे.

## प्रयोगशीलता आणि संशोधन

कोणत्याही कलेच्या, तंत्राच्या वा व्यवसायाच्या विकासाकरिता प्रयोगशीलतेची आवश्यकता आहे. देवनागरी लिपीतील मुद्रणसुवाच्यते-बद्दल विशेष असे संशोधन झालेले नाही. पाश्चात्य देशांत १८२५ पासून असे संशोधन चालू आहे. विशेष म्हणजे या आद्य संशोधकांत केंब्रिज विश्व-विद्यालयातील गणिताचा प्राध्यापक बृहस्पती चार्लस् बॉबेज हा होता. परिगणन यंत्राचा हाच आद्य संशोधक. आपल्या मुद्रणाच्या विविध अंगां-बाबत संशोधन करणे इष्ट आहे. जुळणीची मोनोटाईपसारखी यंत्रे आता इतिहासजमा होत आहेत व त्यांची जागा फोटोकंपोझिंग यंत्रे घेत आहेत. या यंत्रांवर देवनागरीची प्रतिष्ठापना करणे हे एक निकडीचे कार्य आहे.

## देवनागरी टाईपाची विविध वळणे

मुद्राक्षरांच्या वळणांचा अभ्यास हा एक मनोज्ञ विषय आहे. प्रत्येक मुद्राक्षर वळणाला एक स्वतंत्र व्यक्तिमत्व असते. त्यांचा वाचकांच्या मना-वर होणारा परिणाम निरनिराळा असतो. ओव्हिक या शास्त्रज्ञाने या दृष्टीने मुद्राक्षरांचे केलेले वर्गीकरण लक्षात घेण्याजोगे आहे. मुद्राक्षर वळणे जोरदार, सौम्य, काटकसरीची, भव्य, रेखीव, टवटवीत, बटबटीत, सुसंस्कृत, श्रीमंत, नक्षीदार, रोगट, कंटाळवाणी, अस्पष्ट अशी विविध प्रकारची असू शकतात. देवनागरीत उपलब्ध असलेली वळण संख्येने मर्यादित व गुणवत्तेत सर्वसाधारणच आहेत. नवीन वळणांची नितांत आवश्यकता आहे. विशेषतः मराठीत टाईपरायटरवरील अक्षरांचे वळण

सुधारणे तर फार अत्यावश्यक आहे. टंकलिखित मुद्रणप्रत सुस्पष्ट, निर्दोष असण्याकरिता त्याची फारच निकडीची गरज आहे.

## निर्दोष मुद्रण मोहीम (झिरो डिफेक्ट)

राजभाषा वर्षाच्या निमित्ताने सर्व मुद्रणालयांनी निर्दोष मुद्रण मोहीम चालू करणे उचित होईल. 'झिरो डिफेक्ट' या कल्पनेबद्दल येथे विस्तृत विवेचन करणे योग्य नाही. परंतु ही कल्पना आपल्याकडे अद्याप नवीनच असल्याने थोडक्यात तिची माहिती देणे उपयुक्त ठरेल. ही कल्पना १९६१ मध्ये अमेरिकेत फिलिप क्रॉसबी याने प्रथम मांडली. जिम हालपिन याने तिचा विस्तार करून निर्दोष क्षेपणास्त्रे तयार केली. या मोहिमेचे मूळसूत्र म्हणजे 'प्रथमच दोष टाळा' हे होय. प्रत्येक कामगारास आपले काम परिपूर्ण करण्याकरिता प्रवृत्त करणे हा या योजनेचा गाभा आहे. जपानमध्ये या चळवळीला कल्पनेबाहेर यश मिळाले आहे.

अशा मोहिमेची सुरुवात साध्या पद्धतीने करता येईल. सोपी मुद्रण नियमावली करून प्रत्येक कामगारास देता येईल. मुद्रणालयात वापरल्या जाणाऱ्या डॉकेट वगैर सर्व फार्मस्‌वर सुयोग्य अशी घोषवाक्ये छापता येतील. उदाहरणार्थ 'आम्ही आमचे मुद्रण निर्दोष व सुबक करणार'. समर्थ रामदास स्वामींनी सांगितलेला आदर्श

कोठे शोधासी आडेना। चुकी पाहता सापडेना ।।

आजही आपल्याला प्रेरणा देणारा व मार्गदर्शक आहे.

ब्राह्मणे बाळबोध अक्षर । घडसुनी करावे सुंदर ।
जें देखतांचि चतुर । समाधान पावती ।।
वाटोळें सरळें मोकळें । वोतले मसींचे काळें ।
कुळकुळीत वळी चालिल्या ढाळे । मुक्तामाळा जैशा ।।

कालमानानुसार ब्राह्मण म्हणजे मुद्रक व हस्ताक्षराऐवजी मुद्रण असे अर्थातच समजले पाहिजे. मराठी मुद्रण कसे असावे याचे हे अप्रतिम वर्णन आहे. अर्थात त्याकरिता मराठी भाषेवर खरेखुरे प्रेम असले पाहिजे आणि भगीरथ प्रयत्न करण्याची तयारी असली पाहिजे.

# राजभाषेची वाटचाल

भाषा हा एक अत्यंत नाजूक असा सामाजिक व सांस्कृतिक भावबंध आहे. ते एक संस्कृतिसाधन आहे. भाषेचे हे साधन असल्यामुळेच संस्कृती घडते, टिकून राहते व पुढच्या पिढीत संक्रमित होते. अनेकदा भाषेचा विकास हा त्या संस्कृतीच्या विकासाचा द्योतक असतो तर बरेचदा संस्कृतीचा विकास होत राहतो व त्या विकासाच्या अनुरोधाने भाषा समृद्ध होत जाते. भाषेच्या या बंधावर आघात झाला तर समाजजीवन कुंठित होते. दीडदोनशे वर्षांच्या ब्रिटीश राजवटीत भारतात असेच घडले. व्यापाराच्या निमित्ताने आलेले इंग्रज हळूहळू भारताचे सार्वभौम सत्ताधीश झाले. आपली संस्कृती व भाषा त्यांनी येथील लोकांवर मोठ्या खुबीने लादली. जेत्यांचे सर्वच चांगले या धारणेने बऱ्याच लोकांनी त्यावेळी या दोन्ही गोष्टी आपखुषीने स्वीकारल्याही. इंग्रजी शिकल्याने सरकारी नोकरी मिळते व राज्यकर्त्यांच्या लेखी आपण सुशिक्षित व प्रतिष्ठित ठरतो आणि समाजातही आपली मानमान्यता वाढते असा अनुभव येत गेल्याने इंग्रजी शिक्षणाचा फैलाव येथील समाजाच्या वरच्या थरात झपाट्याने होत गेला. इंग्रजी भाषा वाघिणीचे दूध ठरले पण ते बहुजन समाजाला मिळालेच नाही. या दुधामुळे देशी

साहित्य काही अंशी पुष्ट झाले हे खरे. परंतु राज्यव्यवहारात आणि शिक्षणात इंग्रजी भाषा प्रतिष्ठित झाल्यामुळे देशी भाषांचा या क्षेत्रातील संचार रुद्ध झाला.

### भाषावार प्रांतरचनेचे मूळ

ब्रिटिशांची सत्ता भारतात हळूहळू पसरली. येथील प्रदेश जसजसा त्यांच्या कवजात येत गेला तसतसे त्यांनी त्या प्रदेशाचे शासन करण्याच्या दृष्टीने सोयीस्कर भाग पाडले. तसे भाग पाडताना येथील सांस्कृतिक वा भाषिक गटांच्या भावभावनांचा विचार करण्याची त्यांना आवश्यकता वाटली नाही. उलट तसे न करणेच त्यांना सोयीचे वाटले. भाषेमुळे निर्माण होणारी एकात्मता व जागृत होणारी अस्मिता त्यांच्या सत्तेला आव्हान देणारी ठरली असती. राष्ट्रीय काँग्रेसच्या स्थापनेनंतर भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न हे काँग्रेसचे प्रमुख उद्दिष्ट ठरले. विविधतेतील एकतेवर आधारित असलेली भारताची संमिश्र संस्कृती जोपासण्यासाठी भाषावार प्रांतरचना व्हावयास हवी हा विचार हळूहळू प्रबळ होत गेला. काँग्रेससमोर स्वातंत्र्याचे ध्येय असल्यामुळे स्वातंत्र्य मिळेपर्यंत हा विचार थोडासा मागे राहिला हे खरे. पण स्वातंत्र्य मिळाल्यावर परिस्थिती बदलली. भाषावार प्रांतरचनेसाठी चळवळी झाल्या व १९५६ मध्ये भाषावार प्रांतरचना अस्तित्वात आली.

द्विभाषिक मुंबई राज्य अस्तित्वात आल्यानंतर गुजराती व मराठी ह्या येथील राजभाषा करण्याच्या दृष्टीने प्रयत्न सुरू झाले होते. या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्यासाठी त्यावेळचे वित्त मंत्री डॉ. जीवराज मेहता यांच्या अध्यक्षतेखाली 'राजभाषा समिती' नेमण्यात आली. या समितीने आपल्या शिफारशी एप्रिल १९६० मध्ये सादर केल्या. गुजरात राज्यात गुजराती व महाराष्ट्रात मराठी ही राज्यकारभाराची अधिकृत भाषा असावी अशी शिफारस या समितीने केली. राज्यव्यवहाराच्या भाषेतील हा बदल प्रशासनिक कार्यक्षमतेला बाध येणार नाही अशा रीतीने लवकरात लवकर घडवून आणावयाचा होता. हे काम शास्त्रशुद्ध रीतीने

व्हावे यासाठी भाषा संचालनालयाची स्थापना करण्यासंबंधीही ह्या शिफारशीत सुचवले होते.

## महाराष्ट्र राज्याची मुहूर्तमेढ

१ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्याची मुहूर्तमेढ रोवण्यात आली. याप्रसंगी महाराष्ट्राचे पहिले मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी महाराष्ट्राच्या राज्यकारभाराची भाषा मराठी असेल असे घोषित केले. ही घोषणा केल्यानंतर या निर्णयाच्या अंमलबजावणीच्या कामास सुरुवात झाली. इंग्रजीतून चालत असलेला सर्व कारभार दरोबस्त दुसऱ्या दिवसापासूनच मराठीतून चालू लागेल ही अपेक्षा अर्थातच नव्हती. लगेच तसे सुरू केले असते तर अनेक अडचणी उभ्या राहिल्या असत्या व शासन व्यवहाराच्या गाड्याला खीळ पडली असती. यावेळी भाषाविषयक प्रश्नांबाबत शासनाला सल्ला देण्यासाठी शासनाने एक 'भाषा सल्लागार मंडळ' नेमले.

राज्यकारभार इंग्रजीतून होत असल्यामुळे शासकीय सेवेतील सर्वच नोकरदारांचे हुद्दे हे इंग्रजीत होते. भाषा सल्लागार मंडळाला ह्या इंग्रजी हुद्द्यांचे शक्य तितक्या लवकर मराठीकरण करणे आवश्यक वाटले. कारण त्यामुळे मराठीच्या वापरास पोषक असे वातावरण निर्माण होणार होते. म्हणून सर्वप्रथम भाषा संचालनालयाने शासनाच्या सर्व विभागांतील राजपत्रित व अराजपत्रित अधिकाऱ्यांच्या इंग्रजी पदनामांची सूची केली व त्या पदनामांबद्दल समर्पक मराठी पदनामे करण्याचे काम हाती घेतले. या पदनामांचे मराठी प्रतिशब्द ठरविण्यासाठी केंद्र सरकारचे एकरूप परिभाषेचे धोरण विचारात घेऊन काही मूलभूत तत्त्वांचा अवलंब करणे अपरिहार्य होते. शासकीय परिभाषा ही शक्यतोवर अखिल भारतीय स्तरावर एकरूप असावी आणि संस्कृत शब्दांचा उपयोग केल्यास ही एकरूपता आणणे सुलभ होते म्हणून संस्कृत शब्दांचा यथायोग्य उपयोग करावा असे एक निदेशक तत्त्व केंद्र शासनाने घालून दिले होते.

परंतु मराठी भाषेचे स्वरूप लक्षात घेता केवळ संस्कृत शब्दच पदनाम साठी निवडणे भाषा सल्लागार मंडळाला मान्य नव्हते. संस्कृतप्रमाणे उर्दू, फारशी, इंग्रजी अशा विविध भाषांतील आधीच रूढ असलेल्य कित्येक शब्दांचा यावेळी भाषा सल्लागार मंडळाने पुरस्कार केला. रूढ शब्द डावलून नव्याने तयार केलेले शब्द भाषेत घुसडल्यास भाषा कृत्रिम व बोजड होते, याची जाणीव भाषा सल्लागार मंडळाला होती. परंतु जेथ संकल्पना नवीन होत्या व त्यासाठी भाषेत शब्द नव्हते, तेथे त्या संकल्पन व्यक्त करणारे शब्द शब्दसिद्धीच्या नियमांचा वापर करून नव्याने तया करणे भाग होते. अशा रीतीने शासनातील सर्वच पदाधिकाऱ्यांच्या पद नामांचा कोश करण्यात आला. ही पदनामे मुख्यत्वेकरून ज्यांना हरघडी वापरावयाची होती व पर्यायांच्या अर्थव्याप्तीविषयी ज्यांना त्यांची अचूक कल्पना होती अशा, सरकारी कार्यालयांतील अधिकाऱ्यांनी आपापल्या विभागातील पदनामे समर्पक असल्याचा सामान्यतः निर्वाळ दिला होता. ज्या काही सूचना त्यांनी व इतर व्यक्तींनी केल्या त्यांचा भाषा सल्लागार मंडळाने अगत्याने विचार केला आणि अंततः १९६२ मध्ये 'पदनाम कोश' शासनाने प्रसिद्ध केला.

## प्रशासनिक मराठीचा शास्त्रीय विचार

पदनाम कोश प्रसिद्ध झाल्यानंतर त्यातील पर्यायांसंबंधी काही वृत्त-पत्रांनी अनुकूल अभिप्राय प्रकट केले, तर काहींनी त्यासंबंधी नापसंती दर्शवून कडक टीका केली. टीका प्रामाणिक मतभेदातूनच झाली होती. टीका करणारांमध्ये काही नामवंत साहित्यिक होते. त्यामुळे लोकांचा बुद्धिभेद होणार नाही व टीकाकारांचे समाधान होईल अशा पद्धतीने शासनव्यवहाराच्या भाषेसंबंधी शास्त्रीय व व्यावहारिक भूमिका स्पष्ट करणे भाषा सल्लागार मंडळाला अगत्याचे वाटले. राजभाषा म्हणून मराठीला ब्रिटीश कालखंडाअगोदरच्या कालात पूर्वपरंपरा असली तरी त्यापूर्वीच्या आणि स्वातंत्र्योत्तर काळामध्ये बराच फरक पडला होता. शासनव्यवहाराच्या नव्या परंपरा निर्माण झाल्या होत्या. नव्या गरजा

उत्पन्न झाल्या होत्या. त्यानुसार राज्यकारभाराच्या भाषेचे स्वरूप कसे असावे या प्रश्नाचा पुनर्विचार करणे जरूर झाले होते. ठराविक एकसाची दृष्टिकोनातून राजभाषेचा विचार करून भागणारे नव्हते. इतर सर्व प्रश्नां-प्रमाणे शासनव्यवहाराच्या भाषेच्या प्रश्नालाही एक नवा भारतीय संदर्भ प्राप्त झाला होता. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन या प्रश्नासंबंधीची ऐति-हासिक पार्श्वभूमी, त्यामागची शास्त्रीय भूमिका व अखिल भारतीय संदर्भ स्पष्ट होईल अशा रीतीने शासनव्यवहारातील मराठी भाषेच्या स्वरूपासंबंधीचे सोपपत्तिक विवेचन असलेले 'शासनव्यवहारात मराठी: समस्या, स्वरूप व प्रक्रिया' हे पुस्तक भाषा संचालनालयाने १९६४ साली भाषा सल्लागार मंडळाच्या वतीने प्रकाशित केले. या पुस्तकात मराठीची संस्कृती, लोकशाहीतील भाषाधोरण, प्रशासनिक परिभाषेचा विकास इत्यादी बाबींचा सांगोपांग विचार मांडला आहे.

### शासनव्यवहार मराठीत करण्यातील काही अडचणी

शासनव्यवहार मराठीतून करण्यासंबंधीची मुख्य अडचण म्हणजे प्रशासनिक परिभाषेची होती. अधिकाऱ्यांना व लिपिकवर्गीय कर्मचाऱ्यांना मराठीतून कामकाज करण्याचा सराव नव्हता. टिपणी लिहिताना किंवा पत्रे लिहिताना इंग्रजी शब्द जसे चटकन जिभेवर किंवा लेखणीच्या टोकावर येत तसे मराठी शब्द येत ना. या दृष्टीने भाषा सल्लागार मंडळाने शासनव्यवहार कोशाच्या कामाला अग्रक्रम दिला. शासन-व्यवहारात वारंवार येणाऱ्या इंग्रजी शब्दांसाठी समर्पक, सोपे, सुटसुटीत असे मराठी पर्याय तयार करण्याचे काम मंडळाने हाती घेतले. वरवर समानार्थक वाटणारे पण अर्थाच्या छटेमध्ये थोडाफार फरक असलेले शब्द यांचाही मंडळाने साकल्याने विचार केला व अशा शब्दांची शब्दकुळे तयार केलीत. जसे Compensation म्हणजे भरपाई परंतु Compensation शब्दाबरोबरच amends, damages, indem-nity, redress, reparation या शब्दांचा एकत्र विचार करून amend ला प्रतिपूर्ति, damages ला नुकसानभरपाई, indemnity ला

क्षतिपूर्ति, redress ला क्षतिपूरण व reparation ला हानिपूर्ति असे या शब्दांचे नेमके अर्थ दाखविणारे मराठी पर्याय भाषा सल्लागार मंडळाने निश्चित केलेत. हे शब्द तयार करण्याचे काम मंडळाने फार बारकाईने केले आहे व शब्दाच्या नेमक्या अर्थछटा टिपल्या आहेत, हे या कोशाचा वापर करताना जाणवते. वरील कोश पूर्ण व्हावयाच्या अगोदर भाषा संचालनालयाने 'वित्तीय शब्दावली' नावाची एक पुस्तिकाही प्रकाशित केली. शासकीय व्यवहारातील अर्थविषयक व्यवहारास उपयुक्त ठरणारे मराठी शब्द या पुस्तिकेत संकलित केले आहेत. 'प्रशासनिक लेखन' या नावाचा मराठी टिपण्या, पत्रे यांचे नमुने देणारा इंग्रजी-मराठी संग्रह १९६६ मध्ये प्रकाशित केला. त्याचप्रमाणे इंग्रजी वाक्प्रचारांचे मराठी पर्याय देणारे संकलन 'प्रशासन वाक्प्रयोग' १९६८ मध्ये प्रकाशित केले.

शासनव्यवहारात मराठीचा सर्रास वापर होण्याबाबतची दुसरी महत्त्वाची अडचण म्हणजे मराठी लघुलेखकांचा व टंकलेखकांचा अभाव. त्यासाठी भाषा संचालनालयाने खास मराठी लघुलेखन प्रशिक्षणाची व टंकलेखन प्रशिक्षणाची सोय केली. इंग्रजी टंकलेखकांना मराठी टंकलेखनाचे प्रशिक्षण दिले. विभागीय शहरांच्या ठिकाणी लघुलेखनाचे वर्ग उघडले. इंग्रजीतून लघुलेखन घेणाऱ्यांना सोयीची होईल, अशी पिटमनच्या लघुलेखन लिपीसारखी मराठी लघुलेखन लिपी तयार करण्यास उत्तेजन दिले व त्या लिपीचे पुस्तक भाषा संचालनालयाने प्रकाशित केले. १९६८-६९ पर्यंत शासनाने जवळजवळ ७५० इंग्रजी लघुलेखकांना मराठी लघुलिपीचे प्रशिक्षण दिले. तसेच १५०० इंग्रजी टंकलेखकांना मराठी टंकलेखनाचे प्रशिक्षण दिले.

देवनागरी टंकलेखन यंत्र जास्त कार्यक्षम करण्याच्या दृष्टीनेही शासनाने आतापर्यंत भारत सरकारच्या सहकार्याने तसेच स्वतंत्रपणेही प्रयत्न केले. परिणामतः मराठीतील शब्दांच्या वारंवारतेवर आधारित असा शास्त्रशुद्ध मराठी टंकलेखन यंत्राचा कळफलक भाषा संचालनालयाने सिद्ध केला आहे.

टंकलेखन व लघुलेखन प्रशिक्षणाबरोबरच ज्यांची मातृभाषा मराठी नाही अशा शासकीय अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना मराठी भाषा प्रशिक्षणाची योजनाही भाषा संचालनालयाने राबविली आहे. या प्रशिक्षणाला उपयुक्त होईल असे 'राजभाषा परिचय' नामक ४५० पृष्ठांचे पुस्तकही भाषा संचालनालयाने प्रकाशित केले आहे.

## राजभाषा अधिनियम व त्याखालील अधिसूचना

महाराष्ट्राच्या राज्यकारभाराची भाषा मराठी असेल अशी घोषणा १ मे १९६० रोजी करण्यात आली असली तरी या घोषणेला कायद्याचे स्वरूप १९६५ मध्ये दिले गेले. त्यावर्षी महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४ (सन १९६५ चा अधिनियम क्रमांक पाच) हा कायदा विधान मंडळाने पास केला. प्रत्यक्षात या कायद्याच्या काही कलमांची अंमलबजावणी १ मे १९६६ पासून करण्यात आली. काही विशिष्ट गोष्टी उदाहरणार्थ न्यायनिवाडे, महालेखापालाशी पत्रव्यवहार, वैद्यकीय औषधयोजनांचे कागद इत्यादी वगळून इतर सर्व शासकीय व्यवहारांसाठी मराठी ही अधिकृत भाषा राहील अशा प्रकारची अधिसूचना १ मे १९६६ रोजी काढण्यात आली. त्या अधिसूचनेनुसार जिल्हास्तरापर्यंतच्या शासकीय कार्यालयांत व मंत्रालयातही सर्वसाधारण कामकाज मराठीमध्ये सुरू करण्यात कायदेशीर अडचण राहिली नाही.

## राजभाषेचे शिक्षणातील स्थान

राज्यकारभाराच्या माध्यमाचा प्रश्न हा एका दृष्टीने शैक्षणिक माध्यमाशीही निगडित आहे. शिक्षण, विशेषतः विद्यापीठ स्तरावरील शिक्षण हे जर इंग्रजी माध्यमातूनच होत राहील तर परिणामतः शासनाच्या सेवेत येणारा वर्ग हा शासनव्यवहारातही इंग्रजीचाच वापर करणारा असेल. यासाठी शिक्षणाचे सर्वच स्तरांवरील माध्यम मराठी असणे आवश्यक आहे. महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठांनी हे मान्य केले आहे. विद्यापीठीय स्तरावर मराठी माध्यम करावयाचे म्हणजे पहिली

अडचण मराठी पाठ्यपुस्तकांची होती. शास्त्रीय व तांत्रिक विषयांवर प्रमाण ग्रंथ लिहिण्यासाठी एकरूप शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा आवश्यक होती. परिभाषेमध्ये सुसूत्रता यावी व परिभाषा निर्मितीचे काम वेगाने व्हावे या दृष्टीने महाराष्ट्रातील विद्यापीठांच्या कुलगुरूंची व भाषा सल्लागार मंडळाची एक संयुक्त बैठक ऑक्टोबर १९६७ मध्ये कोल्हापूर येथे घेण्यात आली होती. या बैठकीत परिभाषेचे काम भाषा संचालनालयाकडे व पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळाकडे सोपवण्याचे ठरले. त्यानुसार भाषा संचालनालयाने भाषा सल्लागार मंडळाच्या सर्वसाधारण मार्गदर्शनाखाली विद्यापीठात शिकवल्या जाणाऱ्या कला व विज्ञान शाखांतील विषयांसाठी शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा उपसमित्या नेमल्यात. या विषयवार समित्यांमध्ये महाराष्ट्रातील विद्यापीठांचे आणि मराठी विज्ञान परिषदेचे प्रतिनिधी आहेत. या उपसमितीच्या बैठकीत या पर्यायांवर चर्चा होते. विविध पर्यायांपैकी अल्पाक्षरयुक्त, अर्थवान, सुबोध, सोपा पर्याय निवडण्यात येतो. अल्पाक्षरता, सुबोधता, अर्थघनता, एकरूपता असे विविध गुण, निवडलेल्या पर्यायांत आणता यावेत यासाठी बरीच साधकबाधक चर्चा होते. भाषा संचालनालय, या समितींच्या परिभाषा निर्मितीच्या कामाचे समन्वय करते. या परिभाषा समितींच्या सहकार्याने भाषा संचालनालयाने आतापर्यंत गणित, रसायन, ग्रंथालय, समाजशास्त्र, वाणिज्यशास्त्र, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान, शरीरशास्त्र, भूशास्त्र, भौतिकशास्त्र, शिक्षणशास्त्र, यंत्र अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी व स्थापत्य अभियांत्रिकी या विषयांचे परिभाषा कोश प्रकाशित केले आहेत.

मानसशास्त्र, व्यवसाय व्यवस्थापन, लोकप्रशासन, रसायनशास्त्र (सुधारित), विकृतिशास्त्र, सांख्यिकी व गणित (सुधारित) या परिभाषा समित्यांचे काम १९७९-८० मध्ये नव्याने सुरू झाले आहे. परिभाषा निर्मितीचे काम सुरू असतानाच ग्रंथलेखकांना अडचणीचे जाऊ नये म्हणून संकलित करण्यात येत असलेल्या या शब्दसूची विद्यापीठ

ग्रंथनिर्मिती मंडळाकडे, विद्यापीठातील त्या त्या विषयांच्या अभ्यास मंडळांकडे, वाई येथील विश्वकोश मंडळाकडेही पाठवण्यात येतात. परिभाषा निर्मितीच्या कामाची ही नुकतीच सुरुवात आहे. वापराच्या निकषावर ही परिभाषा अखेरीस घासून पहावयास हवी असते. त्या दृष्टीने तयार झालेले वा होत असलेले हे पारिभाषिक शब्द यापुढे अजिबात बदलता येणार नाहीत असे नाही.

## राजभाषेची कायद्याच्या क्षेत्रातील वाटचाल

विधान मंडळापुढे येणारे प्रत्येक विधेयक आणि पास होणारा कायदा यांचा मराठी व हिंदी अनुवादही भाषा संचालनालय विधान मंडळासमोर सादर करण्यासाठी तयार करीत असते. महाराष्ट्र राज्याचे आतापर्यंतचे सर्वच कायदे मराठीमध्ये उपलब्ध करून देण्यात आले आहेत. केंद्र सरकारच्या कायद्यांच्या मराठी अनुवादाचेही काम केंद्र सरकारने महाराष्ट्र शासनाकडे सोपविले आहे. या कामास १९६८ पासून सुरुवात झाली आहे. केंद्रीय कायद्यांच्या अनुवादाचे हे काम बिनचूक व्हावे म्हणून प्रथम भाषा सल्लागार मंडळावर तीन अतिरिक्त विधिज्ञांची नेमणूक करण्यात आली. कालांतराने विधिज्ञांच्या एका स्वतंत्र समितीकडे हे काम सोपवण्यात आले. या समितीने आतापर्यंत ११५ केंद्रीय अधिनियमांच्या मराठी अनुवादाला अंतिम स्वरूप दिले आहे. यांपैकी ८० अधिनियमांच्या मराठी अनुवादाची पुस्तकेही छापून तयार आहेत. भारतीय संविधानाचा या समितीने अद्यावत असा मराठी अनुवाद प्रकाशित केला आहे. या कामाबरोबरच या विधि उपसमितीने आतापर्यंत अनुवादित केलेल्या अधिनियमांच्या आधारे एक न्याय व्यवहार कोश तयार केला आहे.

## प्रशासनिक मराठीचे स्वरूप

सध्या वर्तमानपत्रातून प्रशासनात वापरल्या जाणाऱ्या मराठी भाषेबद्दल बरीच टीका होत असते. प्रशासनात वापरले जाणारे मराठी फार बोजड असते व सर्वसाधारण माणसांना ते समजत नाही अशा प्रकारची ही टीका असते. वास्तविकपणे लोकशाहीची उद्दिष्टे पूर्ण व्हावीत म्हणून

शासनव्यवहाराचे मराठीकरण करण्याचे धोरण आहे. परंतु शासकीय व्यवहारातील मराठी जर जनतेपर्यंत पोचत नसेल किंवा विधान मंडळातील लोकप्रतिनिधींचे विचारविनिमयाचे साधन म्हणून जर त्याचा वापर होत नसेल तर मग या भाषाकरणाला मुळीच अर्थ राहणार नाही. शासकीय आदेश, अधिसूचना, परिपत्रके यांतील मराठी भाषा अनेकदा बोजड आणि दुर्बोध वाटते याचे कारण ते लिखाण मुळातच मराठीतून केलेले नसते. मूळ आदेश, अधिसूचना वा परिपत्रके इंग्रजीत लिहिण्यात येतात व मग त्यांचा मराठी अनुवाद करण्यात येतो. हा अनुवादही जाणकारांकडून केला जात नाही. त्यामुळे नव्या वा जुन्या मराठी शब्दांचा ठोकळेबाजपणे वापर करण्यात येतो व शेवटी मराठीत काय लिहिले आहे हे समजून घेण्यासाठी मूळ इंग्रजी मसुदा पाहण्याचा प्रसंग येतो. मुळातच मराठीत विचार करून आदेश, अधिसूचना, परिपत्रके काढण्यात आली तर ती दुर्बोध होणार नाहीत. शक्यतो मूळ मराठीतच मसुदे तयार करावेत व तांत्रिक मराठी शब्द देवनागरीत लिहिले तरी चालतील अशा प्रकारच्या सूचना आता मंत्रालयीन विभागांना देण्यात आल्या आहेत. स्थित्यंतराच्या या काळामध्ये नवीन पारिभाषिक शब्द रूढ होईपर्यंत ह्या अशा अडचणी येतीलच. त्यांवर वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून मात करावयास हवी.

राजभाषा वर्षाच्या निमित्ताने सर्वांचेच लक्ष राजभाषेकडे आकर्षित झाले आहे. या वर्षाच्या अखेरपर्यंत शासकीय कामकाज किमानपक्षी ६० टक्के तरी मराठीत करण्यात येईल असे उद्दिष्ट ठरवण्यात आले आहे. हे उद्दिष्ट साध्य होण्यास आता कोणतीच अडचण दिसत नाही. तसेच महाराष्ट्र राज्याच्या रजत जयंती वर्षापर्यंत म्हणजे १९८५ पर्यंत महाराष्ट्र शासनाचा संपूर्ण कारभार १०० टक्के निखळ मराठीत होईल अशीही घोषणा राजभाषावर्षी करण्यात आली आहे. त्या सोनियाच्या दिवसाकडे राजभाषेची वाटचाल सुरू आहे.

# व्यक्ती-विषय सूची

